# बाळबोध.

# BALABODHA.

पुस्तक तिसरें.

१८८३ एप्रिल—१८८४ मार्च.



मुंबई

"निर्णयसागर" छापखाना.

१८८५.

# बालबोधाच्या तिसऱ्या पुस्तकाची
## अनुक्रमणिका.

# बालबोध.



## डाक्टर जान्सन.



### श्लोक.

विद्वत्व आणि राजत्व, ह्यांचें साम्य नव्हे कधीं;
स्वदेशीं पूजिती राजा, विद्वान् सर्वत्र पूजिती. १.

असें एका नामांकित ग्रंथकारानें ह्मटलें आहे, तें खरें आहे. मोठमोठ्या पराक्रमी राजांचीं कृत्यें, कालें-करून, जनांच्या उपयोगीं पडेनातशीं होतात, किंबहुना नाहींतशीं होतात. परंतु, विद्वानांच्या कृति पृथ्वीवरच्या सर्व लोकांस निरंतर उपयोगीं पडतात. अशा प्रकारचे जे विद्वान पुरुष इंग्लंडांत होऊन गेले, त्यांत डाक्टर

जान्सन ह्याची गणना आहे. त्याचें चरित्र आह्मी ये
थोडक्यांत लिहितों.

जान्सन हा इंग्लंड देशामध्यें लिचफील्ड येथें इ०
स० १७०९च्या सप्तंबर महिन्याच्या १८ व्या ता
रखेस जन्मला. त्याचीं आईबापें चांगलीं सभ्य आणि
सुशिक्षित होतीं. त्यांनीं त्याला लहानपणीं बरीच विद्या
शिकविली, आणि मग शाळेंत घातलें. तो एकपाठी
होता; आणि त्याची बुद्धि विलक्षण होती. तिच्या
योगानें विद्यार्थ्यांत त्याचें फार वजन असे. पुढें दोन
वर्षेंपर्यंत त्यानें एका शाळेंत शिक्षकाचें काम केलें.
त्याला लिहिण्यावाचण्याचा नाद लहानपणापासून फार
असे. आक्सफोर्ड येथील पेंब्रोक पाठशाळेमध्यें त्यानें
उत्तम अभ्यास करून मोठी वाहवा मिळविली. नंतर,
कांहीं उद्योग करावा ह्या उद्देशानें, तो, आपला वि-
द्यार्थी ग्यारिक ह्यास बरोबर घेऊन, इ० स० १७३७ ह्या
वर्षीं लंडनास आला. तेव्हां त्यापाशीं पैसा मुळींच न-
व्हता; आणि आपलें पुढें कसें चालेल, ह्याची त्याला
मोठी काळजी होती. परंतु, तो लिहिणारा फार
उत्कृष्ट होता. त्याचे लेख बाहेर पडूं लागले,
तसतसे ते लोकांस आवडून, लंडन शहरांतल्या
संपत्तिमान आणि विद्वान लोकांत त्याची आख्या होऊं
लागली. इ० स० १७४७त त्यानें आपला इंग्लिश
भाषेचा कोश छापण्याचा विचार प्रगट केला. तो वि-
कत घेण्यास, छापखानेवाले, १५७५० रु० त्यास द्या-
वयास तयार झाले. तो कोश पुढें इ० स० १७५५ त
छापून प्रसिद्ध झाला. त्याच वर्षीं आक्सफोर्ड येथील

महाविद्वत्सभेनें त्यास सर्वांत मोठी विद्वानाची पदवी दिली. त्याचे विचार फार गहन असत; आणि त्याला लिहिण्याची शैली उत्तम साधली होती. त्यामुळें त्याची लौकिक राजाच्या कानापर्यंत जाऊन त्याचें माहात्म्य फारच वाढलें. लोक त्याला तत्त्वज्ञानी समजूं लागले. त्याचे नीतिपर निबंध मनुष्यास सत्पथ दाखविण्यास पुष्कळ साह्यभूत झाले आहेत; ते लेख अद्यापही विद्वानांस मान्य आणि रसिकांस प्रिय असे आहेत. तो नेहमीं ज्ञानसंपादनाच्या उद्योगांत गुंतलेला असे. आणि, आपणास ज्या चांगल्या गोष्टी कळतील त्या इतर जनांस सांगणें, व जें ज्ञान प्राप्त होईल त्याप्रमाणें वागणें, हेंच ज्ञानसंपादनाचें उत्तम सार्थक्य आहे, असें त्याच्या अंतःकरणांत भरून गेलें होतें; आणि त्याचें आचरण सदोदित तसें असे. शिवाय, वादाविवाद करण्याचें सामर्थ्य त्याला एवढें होतें कीं, जो पक्ष तो हातांत घेई, त्याच्या उलट बोलणारांस त्याच्या पुढें जय कधीं मिळालाच नाहीं. आणखी, तो अंतःकरणाचा अगदीं निर्मळ असून मोठा परोपकारी होता. ह्या गुणांच्या योगानें लोक त्याला एकाद्या मोठ्या साधूप्रमाणें भजत असत. जान्सन ह्याची विद्वत्ता, आचरण आणि योग्यता हीं अप्रतिम आहेत असें पाहून, इ० स० १७६९ ह्या वर्षीं, इंग्लंड देशाचा राजा तिसरा जार्ज ह्यानें त्यास दरसाल तीन हजार रुपये पेनशन करून दिलें. हा महा विद्वान पुरुष इ० स० १७८४ च्या डिसेंबर महिन्याच्या १३ व्या तारखेस मरण पावला. तेव्हां ह्याचें वय ७५ वर्षांचें होतें.

जान्सन ह्याचे लेख खोल आणि गंभीर असत. त्यांतल्या एका वाक्याचें तात्पर्य येथें केवळ मासल्याकरितां सादर करून ही गोष्ट आह्मी समाप्त करितों:—"ज्ञानरहित सत्य जें आहे, तें, अगदीं थोडें उपयोगीं पडणारें, किंबहुना अगदीं निरूपयोगी होय. आणि, सत्यरहित ज्ञान जें आहे, तें, भलत्याच मार्गास लावणारें आणि भयंकर होय." ह्मणजे, मनुष्याचें कल्याण होण्यास ज्ञान आणि सत्य ह्यांची सांगड जमली पाहिजे. खरें आहे.

---

## गाय आणि तिचा वत्स.

### आर्या.

माते काय करावें दूध तुझें गे मला पुरत नाहीं
भूक न भागे तेणें चैन पडेना मनास या कांहीं. १.
तूं ह्मणतेस पुरवितो **विश्वंभर** खावया समस्तातें
हें मज खरें न वाटे सांग कसें स्पष्ट बालका या तें. २.
किंवा इतरीं सर्वीं त्यानें परिपूर्ण योजना केली
पारि विस्मृति या [1]दीनीं दुर्दैवें काय आड गे [2]ठेली. ३.
वत्सा असें कदापि न भलभलतें त्वां उगाचि बोलावें
[3]सुज्ञमुखें त[4]ल्लीला समजुनि घेउनि [5]बुधांत डोलावें. ४.
ज्यानें जीव तसा हा देह तुला करुनियां दया दिधला
तो तव चरितार्थाची तजवीज न काय बा करील भला. ५.
अत्यल्प कीटकातें देखीलहि पाळितो **दयासिंधू**
तो तुज विसरेल कसा त्याला वत्सा उगा नको निंदूं. ६.

---

१ गरीबाविषयीं. २ आली. ३ थोरांच्या तोंडून. ४ त्याची लीला. ५ सुज्ञांत.

तुझिया निर्वाहाला पुरेलसें दूध माझिया थानीं
त्यानें दिधलें आहे हें माझें वचन तूं खरें मानीं. ७.
परि काय करावें हे जन पुष्कळ त्यांतलें बळें नेती
निज सौख्य वाढवाया अन्या जीवांस दुःख ते देती. ८.
मधुमक्षिका[1] बिचाऱ्या रात्रदिवस खपुनि जो मध करीती
त्याचें हरण कराया ते त्यांतें मारीती अधमरीती[2]. ९.
कित्येकां प्राण्यांतें चरचर कापून भक्षिती मास
इतकेंहि करुनि ह्मणवुनि घ्याया सदय[3] प्रयत्न हर्ष[4]यास. १०.
ह्या जनकपटकृतीतें तुझिया चित्तांत किंतु[5] जो आला
तो सोडोनि करावें योग्य विचारें विशंकित[6] मनाला. ११.
आणि प्राप्त स्थिति ते उत्तम समजोनि तुष्ट[7] राहावें
देवाच्या लीलेतें शांतें चित्तें करोनि पाहावें. १२.

---

## वजाबाकी.

वजाबाकी हा गणितांतला विषय आहे. ह्याचा संबंध इतर व्यवहारांशीं नाहीं, असें प्रथमदर्शनीं मनांत येतें. परंतु, थोडा विचार केल्यावर असें कळतें कीं, साधारण कामकाजांतही मनुष्यास वजाबाकीची गरज लागते. ती वजाबाकी ज्यांना बरोबर करितां येते, त्यांचे सर्व उद्योग सफल होतात; आणि ती ज्यांची चुकते, ते फसतात.

मंडळी जेवायास बोलावावयाची झाल्यास, आपल्या घरांत अन्न आहे किती, आणि जी मंडळी आपणास बोलावावयाची आहे, तीस पुरण्यास अन्न लागेल किती,

---

१ मधमाशा. २ दुष्ट रीतीनें. ३ दयाळू. ४ इच्छा. ५ संशय. ६ संशयरहित. ७ आनंदित.

ह्यांची वजाबाकी मनुष्यास करितां आली पाहिजे, आणि जें अन्न मंडळीस लागण्याचा संभव आहे, तें, घरांतल्या अन्नांत वजा जाऊन, थोडें तरी बाकी राही, अशी योजना त्यानें केली पाहिजे. नाहींतर फजीती व्हावयाची.

कोणतेंही एकादें काम हातीं घ्यावयाचें मनांत आल्यावर, प्रथम, त्यास सामर्थ्य पाहिजे किती, आणि आपलेठायीं आहे किती, ह्याचा चांगला अजमास करावा; त्या कामास जें सामर्थ्य लागतेंसें दिसतें, त्यापेक्षां बरेंच अधिक लागेल, असें समजावें; आणि आपलेठायीं जें सामर्थ्य आहे असें आपणास वाटत असतें, त्यापेक्षां तें बरेंच कमी आहे असें गणावें; नंतर मग, त्यांची वजाबाकी करून, आपल्या आंगचें सामर्थ्य जर बरेंच बाकी राहिल्यासारखें दिसलें, तर त्या कामास हात घालावा; एरव्हीं घालूं नये. कामास जें सामर्थ्य खरोखर पाहिजे असतें, त्यापेक्षां तें कमी लागेल असें मनुष्यास वाटत असतें, आणि त्याचे ठायीं जें सामर्थ्य खरोखरी असतें, त्यापेक्षां तें त्याला पुष्कळ अधिक भासत असतें; ह्या चुक्या होऊं नयेत, ह्मणून फार जपलें पाहिजे.

वजाबाकी करण्यास दोन संख्या पूर्णपणें समजल्या पाहिजेत. त्यांतली एकादी बरोबर कळली नाहीं ह्मणजे, चुकून, मनुष्य, लहानीस मोठी आणि मोठीस लहान मानून, लहानींतून मोठी वजा करण्याच्या खटपटीस लागतो, आणि त्याच्या योगानें त्याची हानि होते. राज्यव्यवहारामध्यें हा प्रकार वारंवार घडतो. कां कीं, प्रतिपक्षाचें सामर्थ्य बरोबर कळण्यास फारसा मार्ग नसतो. सुराजउद्दवल्यास, स्वतःचें सामर्थ्य, खरोखर होतें

त्यापेक्षां फार अधिक वाटलें; आणि इंग्लिशांचें सामर्थ्य आणि फितूर हीं, खरोखर होतीं त्यांपेक्षां फार कमी दिसलीं; ह्मणून, सगळें उलटें होउन वजाबाकी चुकली, आणि त्याचा नाश झाला. त्याप्रमाणेंच, दुसरे बाजीराव ह्यांची वजाबाकी चुकल्यामुळें त्यांचा नाश झाला.

गणितांतली वजाबाकी चुकली, तर ती चूक काढून टाकून उदाहरण नीट करितां येतें; आणि उत्तर बरोबर जमतें. परंतु, मोठमोठ्या कामांतली, आणि त्यांत विशेषेंकरून राज्यव्यवहारांतली वजाबाकी एकदा चुकली, ह्मणजे ती चुकलीच; ती चूक कधींही काढितां यावयाची नाहीं. ह्यास्तव, ज्यांचे हातीं मोठमोठीं कामें असतात, त्यांनीं, प्रथम दोन्ही पदें पूर्णपणें समजून घेऊन, आणि वजाबाकी करून पाहून, मग काय करणें तें करावें. घाईनें चूक होऊं देऊं नये.

---

## आपली खोड आपण पहावी.

एका चौकस वृद्ध गृहस्थाच्या तोंडून आह्मीं असें ऐकिलें आहे कीं, आपले नामांकित कवि मोरोपंत हे जेव्हां धुळीच्या पाटीवर आपलें काव्य लिहायास लागत, तेव्हां, त्यांचा डावा हात, झाडून टाकल्यासारखा किंवा दुसऱ्यास दूर व्हा ह्मणून सुचविल्यासारखा एकसारखा हालत असे. त्यावर कोणीं भक्तांनीं अशी कोटी बसवून ठेविली आहे कीं, यमक श्लेष, प्रास. इत्यादि अलंकारांच्या झुंडी त्यांच्या रसाळ काव्यांत उड्या घालण्यास गर्दी करून येत, त्यांस ते, तसा हात करून, अमळ दम खा, असें सांगत. कोटी ठीक आहे. पण,

ती त्यांस खोड होती, हें त्यांनीं देखील कबूल केलें असतें.

-अशा कितीएक लहान लहान खोडी मनुष्यांमध्यें असतात. त्या सहसा त्यांच्या स्वतःच्या लक्षांत येत नाहींत. बोलत असतां पाय हालवणें; "समजलें कीं नाहीं," "तुमचा देव भला करो," "तुमच्या गळ्या शपत," इत्यादि शब्दांचा उच्चार, बोलण्यांत वारंवार करणें; लिहितांना जीभ बाहेर काढणें, ओंठ चावणें, किंवा लेखणीच्या वळणाप्रमाणें तोंडें वेडींवांकडीं करणें; कांहीं कारण नसतां मध्येंच खांदा उडाविणें; नाकांत बोटें घालून उगाच मळ्या काढणें; अशा अनेक खोडी जनांत दृष्टीस पडतात. तशी एकादी आपले ठायीं आहे कीं काय, हें लक्षपूर्वक पहावें, आणि तशी असल्यास ती काढून टाकण्याचा प्रयत्न करावा. ह्या खोडींपासून कांहीं मोठी हानि होत नाहीं. परंतु. त्या कधीं कधीं उपहासास कारण होतात. ह्मणून त्यांविषयीं जपावें.

---

## गणितप्रश्न.

(१). पांचांचे आंकडे चार आहेत. त्यांच्या तीन रकमा अशा बनवा कीं, त्यांची एकंदर बेरीज अकरा होईल.

(२). एका वाण्यापाशीं ४० शेर वजनाचा एक लोखंडाचा तुकडा होता. त्यानें लोहारास बोलावून आणून असें सांगितलें कीं, ह्याचीं चार वेगळीं वेगळीं वजनें अशीं करून दे कीं, तीं जवळ असलीं म्हणजे एक शेरापासून चाळीस शेरपर्यंत कितीही माल असला तरी तोलितां यावा; शेराचे भाग तोलण्याचें प्रयोजन नाहीं. तर त्यानें ते चार तुकडे किती किती वजनाचे करावे ?

# बालबोध.

## दोस्तमहंमद.



अफगाणिस्थान हा देश हिंदुस्थानाच्या वायव्येस आहे, आणि त्या दोहोंच्या मध्यें सुलेमान पर्वत आहे. अफगाणिस्थान हा देश बहुत वर्षांपासून मुसलमानांच्या स्वाधीन आहे. त्यांत अनेक संस्थानें आहेत. त्यांचे राजे नेहमीं एकमेकांशीं भांडत असतात. तेथला नामांकित मोठा राजा अहमदशाहा अबदल्ली ह्यानें इ० स० १७६१ त हिंदुस्थानावर स्वारी केली होती; तिची हकीकत सर्वत्र प्रसिद्ध आहे. त्याचा नातू शहासुजा हा तेथें ह्या शतकाच्या आरंभीं राज्य करीत होता. परंतु,

## साधूचें स्वचरित्रकथन.

### साक्या.

प्रातःकाळीं उठोनि आधीं ध्यातों दीनदयाळा
निजभक्तांचें हित करणें प्रिय आहे फार जयाला. १.
सूर्योदय झाल्यावर करितों संपूर्ण नेमधर्म
कीं त्याच्या योगानें पावे मानव जनांत शर्म. २.
नंतर निजचरितार्थाकरितां करितों अनेक कामें
नाहीं जाऊं देत पलहि मी सहसा एक रिकामें. ३.
साधायाला महा लाभ कीं टाळायाला हानी
नाहीं बोलत असत्य कीं तें पाप थोर मी मानीं. ४.
स्तोत्रें पुढती मागें निंदा हें नाहीं मज ठावें
जें विष ह्मणती सगळे तें कां बुद्ध्या आपण खावें. ५.
सर्वांशीं नम्रता हितावह उद्धटपण तें खोटें
ऐसें वदले जयांस ह्मणती सगळे मोठे मोठे. ६.
तें निजचित्तीं धरोनि तैसा जनीं वागतों साचा.
तेणें मजला लाभ निरंतर होय अमोघ सुखाचा. ७.
मजवर करिती लोभ सकल जन साह्य तसें मज भारी
कमी पडेना मजला कांहीं तेणें या संसारीं. ८.
रहावयाला साधें खोपट भाजीभाकर खाया
तैशीं वस्त्रें जाडींभरडीं मिळतात पांघराया. ९.
उद्योगानें श्रम होती बहु भूक चांगली लागे
खाणें नियमित तेणें स्वप्नीं देखिल न रोग वागे. १०.
देणें नाहीं द्रुखणें नाहीं निर्वाह कमी नाहीं
त्यांत आणखी भार आमुचा तो विश्वंभर वाही. ११.

---

१ कल्याण. २ स्तुति. ३ तोंडावर.

अशा प्रकारें दिवस लोटितों मानुनियां आभार
त्याचे निजतों स्वस्थ सुखावह गमतो हा आचार. १२.

---

## प्रेम हें शांतीचें मूलस्थान होय.

एका कुटुंबांतलीं माणसें ह्मटलीं ह्मणजे एका झाडाचीं पानें होत, अथवा एका प्राण्याचे अवयव होत. त्यांतल्या एकास दुःख झालें ह्मणजे बाकीच्यांस दुःख व्हावें, आणि त्यांतल्या एकास सुख झालें ह्मणजे बाकीच्यांस सुख व्हावें, हें योग्य आणि आवश्यक आहे. आणि जगामध्यें तशी योजना आढळून येते. झाडाच्या एका फांदीस किडा लागला ह्मणजे बाकीच्या फांद्या अशक्त आणि रोगी होतात; त्याप्रमाणेंच, त्याच्या एका बाजूवर पाणी शिंपडल्याबरोबर दुसरी बाजू टवटवीत दिसूं लागते. हाच प्रकार मनुष्यांमध्यें. पायाला कांटा टोंचला ह्मणजे लागलेंच डोळ्यांला पाणी येतें; आणि, गाण्याची उत्तम लहर कांनीं पडल्याबरोबर, हात आपोआप उठून टाळी देतो. ह्यांपैकीं झाडांतल्या पर्यायांत कधीं विपर्यास पडत नाहीं; कांकीं त्यांस मनोविकार नाहींत. परंतु, मनुष्यांच्या पर्यायांत पुष्कळ अंतर पडतें. कां कीं, त्यांच्या मनांवर लोभ मत्सर इत्यादि मनोविकारांचा अमल चालतो. तो अमल चालल्यानें मोठे मोठे कलह माजतात; आणि त्यांच्या पायीं कुटुंबें सर्वस्वीं नाश पावतात. ह्याचीं उदाहरणें इतिहासांत पाहिजेत तितकीं आढळतात. रावण आणि बिभीषण; कौरव आणि पांडव; सुराजउद्दवला आणि मीरजाफर; थोरले माधवराव साहेब आणि राघोबादादा;

सातारचे प्रतापसिंह महाराज आणि आपासाहेब महाराज; इत्यादि दोन पक्षांमध्यें कलह माजल्यामुळें शेवटीं राज्यांचा कसा नाश झाला, तो मनांत आणावा; आणि असें खचींत समजावें कीं, ज्या ह्या कलहकुठारानें प्रचंड राज्यवृक्ष रसातळास मिळविले आहेत, तो कलहकुठार सामान्य कुटुंबास एका क्षणांत धुळीस मिळवील. ह्यास्तव तो टाळण्याविषयीं होईल तितका प्रयत्न करणें हें शहाणपणाचें मुख्य लक्षण होय. हें लक्षण अंगीं धरायाचें ह्मटलें ह्मणजे पुष्कळ पड घ्यावी लागते; आणि कधीं कधीं अत्यंत निर्लोभता धरावी लागते. तें काम कठिण आहे. तथापि विचारी पुरुष तें करितात. कां कीं त्यांत कल्याण आहे.

इराण देशाचा राजा डरायस हा इसवी सनापूर्वीं ४८५ वे वर्षीं मरण पावला. तेव्हां त्याला सात मुलगे होते; सिंहासनारूढ होण्यापूर्वीं पहिल्या बायकोपासून झालेले तीन; आणि सिंहासनारूढ झाल्यानंतर दुसऱ्या बायकोपासून झालेले चार. त्या तिघांत आर्टामानीस हा वडील होता; आणि त्या चौघांत झर्कसिज हा वडील होता. त्यांपैकीं गादीवर कोणीं बसावें, हा वाद पडला; आणि मोठा कलह माजेल असें वाटलें. परंतु त्यांनीं एकविचारानें असा निश्चय केला कीं, आपला चुलता आर्टाबानीस हा फार विचारी आहे; तो सांगेल तें उभयतांनीं शिरसावंद्य मानावें. त्यानंतर आपल्यांतल्या सर्व व्यवहारांचा विचार करून आर्टाबानीस ह्यानें दरबारांत असें सांगितलें कीं, झर्कसिज ह्यानें राजासनारूढ व्हावें. तें कानीं पडतांच आर्टामानीस ह्यानें

आपलें वडीलपण आणि राज्यलोभ हीं एकीकडे ठेवून, अत्यंत नम्रपणानें झर्कसिज ह्यास साष्टांग नमस्कार घातला, आणि त्यास आपल्या हातीं धरून सिंहासनावर बसवून, त्यापुढें हात जोडून उभें राहून ह्मटलें, "महाराज, आपण प्रभु आहांत. ह्या दासास आपली आज्ञा शिरसामान्य आहे." त्यानंतर आर्टामानीस हा झर्कसिज ह्याच्या सैन्यांत सरदार होऊन राहिला, आणि, इसवी सनापूर्वीं ४८० वर्षीं सालामिस येथें इराणी लोक आणि ग्रीक लोक ह्यांचें जें तुमुल युद्ध झालें, त्यांत मोठ्या शौर्यानें लढून मरण पावला.

आपल्या वडिलांच्या अल्पस्वल्प दौलतीवरून सखे भाऊ किती सरकारदरबार करून आपला नाश करून घेतात बरें! त्यांनीं हें उदाहरण नेहमीं लक्ष्यांत ठेवावें. कुटुंबाच्या कल्याणाकरितां आर्टामानीस ह्यानें एवढ्या मोठ्या राज्याविषयीं जर मन मोठें केलें, तर यःकश्चित जिनगीविषयीं आपलें मन कुटुंबाच्या कल्याणाकरितां आपण मोठें करावें, हें योग्य आहे, असें सर्वांनीं मनांत धरून त्याप्रमाणें चालावें. त्याच्या योगानें दुनयेंतलें पुष्कळ दुःख कमी होऊन, सुखाची वृद्धि होईल.

---

## घोडा प्रधान.

प्राचीन काळीं रोमन लोकांमध्यें कालिगुला ह्मणून एक बादशहा होऊन गेला. तो स्वभावानें फार चमत्कारिक असे. त्याचा एक फार आवडता घोडा होता. त्याला रहायाला उत्तम संगमरवरी दगडांचा सुंदर तबेला होता; खाणें खावयास फार किमतीचे हस्तिदंती प-

डगे होते; आणि त्याचा दररोज खायाचा दाणा वर्ख चढविलेला असे; अशी त्याची मिजास त्या बादशहानें ठेविली होती. एवढेंच केवळ नव्हे. तर, त्यानें त्याला आपल्या दरबारांत प्रधान नेमिलें होतें; आणि, इतर प्रधानांप्रमाणें त्याचा लवाजमा ठेविला होता, असें सांगतात!

पशुपक्ष्यांस अशा प्रकारचे सोहळे जे कोणी करितात, त्यांस सुज्ञ जन पशुपक्ष्यांत गणितात, हें राजपदारूढ पुरुषांस कळूं नये काय?

## अतिलोभाचें फळ.

जनाचे डोळे उघडण्यास साधुजन नानाप्रकारीं बोध करितात. त्यांत दृष्टांतानें बोध करण्याचा जो पर्याय आहे, तो उत्तम होय. त्याचा हा एक फार चांगला मासला आहे. ह्यावरून अतिलोभानें कसा परिणाम होतो, हें तात्काळ लक्षांत येतें.

### ओव्या.

सिंह निद्रिस्त पाहोनि वदन दशनीं[1] अडकले मांसकण
त्यांचें करावया भक्षण मुखामाजी पक्षी प्रवेशे. १.
तें मांस भक्षिलिया सकळ शेखीं शहाणा नोहेचि बरळे[2]
जिव्हा सुरंग मृदु मवाळ ह्मणूनि झोंबे भक्षावया. २.
चंचू लागतां तीक्ष्ण सिंहें मिळविलें वदन[3]
ग्रास झाला तेव्हां ज्ञान फळा आलें तयाचें. ३.

मुक्तेश्वर.

## मागच्या अंकांतल्या प्रश्नांचीं उत्तरें.

( १ ). त्या तीन रकमा ह्या: ५; $\frac{५}{६}$; ५.

( २ ). तीं चार वजनें अशीं; एक एक शेराचें; दुसरें तीन शेरांचें; तिसरें नऊ शेरांचें; आणि चवथें सत्तावीस शेरांचें.

---

१ दातांत. २ असमंजस. ३ तोंड.

# बालबोध.



## नाना शंकरशेट.



देहे त्यागितां कीर्ति मागें उरावी.

रामदास.

जन्मास आलेल्या प्राण्यास केव्हांना केव्हां तरी मरणें आहे. त्यांत मागें नांव ठेवून मरणें हें भूषणप्रद होय. आमच्या ह्या महाराष्ट्र देशामध्यें जे पुरुष असें नांव मागें ठेवून गेले, त्यांतील उत्तमांत श्रीमंत राजमान्य राजश्री जगन्नाथ शंकरशेट ह्यांची गणना आहे. हे गृहस्थ नाना शंकरशेट ह्या नांवानें सर्वत्र प्रसिद्ध आहेत. ह्यांच्या चरित्रांतल्या मुख्य मुख्य गोष्टी आह्मी येथें सादर करितों.

हे गृहस्थ सोनारजातीचे होते. ह्यांचें जन्म इ० स० १८०० ह्या वर्षीं झालें. हे व्यापार करीत असत. त्यांत ह्यांची साख उत्तम प्रकारची होती. ते व्यापारी होते, आणि त्यांस लहानपणीं जरी फारसें उत्तम शिक्षण मिळालें नव्हतें, तरी, त्यांचें लक्ष स्वदेशाच्या कल्याणाकडे अतिशयित असे. ह्या प्रांतांतील लोकांस शिक्षण देण्याच्या उद्देशानें जी मंडळी इ०स०१८२२त प्रथमतः स्थापित झाली, तीमध्यें हे शेट प्रमुख होते. विद्येचा प्रसार करण्याविषयीं हे नेहमीं झटत असत. एतद्देशीय लोकांस जुरीमध्यें घेण्याच्या खटपटींत हे पुढारी होते. त्याप्रमाणेंच जस्टिस आफ् धि पीसचा अधिकार एतद्देशीय लोकांस सरकाराकडून देवविण्यांतही ह्यांनीं पुष्कळ परिश्रम केले. आणि ह्या सर्व कामांत त्यांस यश आलें. ते इतके उद्योगी, इतके चतुर, आणि स्वदेशहिताविषयीं इतके दक्ष होते असें पाहून, मुंबईचे गव्हरनर सर जार्ज क्लार्क ह्यांनीं त्यांस कायदे कौन्सलाचे सभासद नेमिलें. तें काम त्यांनीं फार निस्पृहपणानें उत्तम प्रकारें चालविलें. सोनापुराची जी जागा भरवस्तींत राहिली आहे, ती ह्यांच्या परिश्रमाचें फल होय. शिवाय धर्मशाला वगैरे त्यांचीं धर्मकृत्यें अनेक आहेत. ह्या त्यांच्या अनुपम गुणांवरून मुंबईच्या लोकांनीं आपल्या खर्चानें त्यांचा पुतळा टौनहालांत स्थापिला आहे.

हें सार्वजनिक कामांविषयीं झालें. आतां त्यांच्या स्वभावाविषयीं सांगितलें पाहिजे. हे शेटजी मोठे श्रीमंत होते, तरी, लहानापासून थोरापर्यंत सर्वांवर ते सारखें प्रेम करीत असत. त्यांच्याठायीं असा कांहीं विलक्षण

गुण होता कीं, इतरांच्या हातच्या हजार रुपयांच्या दानापासून याचकास जो संतोष व्हावा, तो ह्यांच्या हातच्या एक रुपयाच्या दानानें होत असे; आणि जे कोणी त्यांशीं संबंध ठेवीत, त्यांतील प्रत्येकास असें वाटे कीं, नानांचा लोभ जितका मजवर आहे, तितका दुसऱ्या कोणावर नाहीं. हे अत्यंत कर्मनिष्ठ, कथापुराणांचे उत्तम भोक्ते, आणि आमच्यांतल्या हरएक गुणी मनुष्याचे आश्रयदाते होते. ह्यांचा डामडौल राजेरजवाड्यांप्रमाणें असून, वर्तनही तसेंच थोरपणाचें असे.

"नानांची इंग्रजी शाळा" ह्मणून जी शाळा मुंबईंतील आबालवृद्धांस ठाऊक आहे, ती शेटजींच्या आश्रयानें इ० स० १८५७ पासून एकसारखी चालली आहे. ही त्यांच्या औदार्याची उत्तम साक्ष होय.

हे थोर गृहस्थ इ० स० १८६५च्या जुलै महिन्याच्या ३१व्या तारखेस मरण पावले. स्वदेशहिताविषयींची दक्षता, सुशीलता, आणि औदार्य हे गुण ह्यांचे ठायीं उत्तमप्रकारें वसत होते.

---

## शाळेचें वर्णन.

### श्लोक.

पहा थोरली रम्य ही पाठशाळा
जना ज्ञानपीयूष[1] पाजावयाला
किती वाचिती लेखनातें करीती
किती भाषणें ऐकती लोकरीती. १.

---

१ ज्ञानामृत.

किती घोकिती संस्कृताध्याय भारी
किती इंग्रजी पाठ नानाप्रकारीं
किती भूमितीच्या गुणीं मग्न होती
कळेना तयां काय आहे सभोंतीं. २.
किती एक विद्युत्प्रकाशा धराया
तसे भानुतेजाप्रती[1] आंवराया
प्रयत्नीं पहा हे किती लुब्ध होती
सुखाची तयांना नसे शुद्ध हो ती. ३.
कुणीं विश्व केलें स्वतां सिद्ध झालें
कुठें स्वर्ग हे धर्म कैसे निघाले
असे वाद हे पूर्ण रंगास आले
तयां ऐकतां सुज्ञ चित्तीं निवाले. ४.
अवाढव्य हें विश्व हा ग्रंथ साचा
असे निर्मिता निश्चयें देव याचा
करावा तया यत्न वाचावयाचा
सदा सांपडे त्यांत ठेवा सुखाचा. ५.
असे वाचिला आजपर्यंत जो तो
महासागरीं बिंदुसा मात्र होतो
म्हणोनी तयाच्या न गर्वे फुगावें
तयाचें पहाणें सदा चालवावें. ६.

---

## परीक्षा.

कितीएकांचा असा समज आहे कीं, परीक्षेचा नेट काय तो विद्यार्थ्यांच्या मागें किंवा सरकारी नौकरी मिळवूं इच्छिणाऱ्यांच्या मागें मात्र असतो; इतरांच्या मागें न-

---

१ सूर्यप्रकाश.

सतो. परंतु ही भ्रांति आहे. विचार करून पाहिलें ह्मणजे असें दिसून येतें कीं, परीक्षेचा नेट मागें नाहीं, असें एक देखील मनुष्य ह्या जगांत सांपडावयाचें नाहीं. चाह्माराजवळ आपण आपला जोडा ठिगळ लावायास देतों, तें काम अगदीं क्षुल्लक आहे, ही गोष्ट खरी आहे. तथापि, त्यांत, तो चाह्मार प्रामाणिक आहे कीं कसा आहे, व आपण कसे आहों, ह्याची परीक्षा असते. ह्मणजे, त्या चाह्मारानें करारापेक्षां एक टांका कमी घातला, ह्मणजे तो बेइमान ठरतो; आणि त्या तेवढ्या कारणावरून जर आपण तंटा केला, तर आपण हलकट ठरतों.

विद्यार्थी अतिशयित श्रम करून नानाप्रकारच्या गहन विषयांचें अध्ययन करितात, आणि विद्वन्मंडळासमोर परीक्षा देऊन शास्त्री, पंडित, भट्ट अशा पदव्या मिळवितात, आणि मोठमोठीं बक्षिसें संपादितात. त्याप्रमाणेंच, जगांतल्या व्यवहारामध्यें क्रोधलोभादिकांस जिंकून, शांति, औदार्य, न्यायनिष्ठा इत्यादि गुण अंगीं धरितात, तेच, सत्पुरुष किंवा सज्जन ही पदवी पावतात; इतर पावत नाहींत. तेव्हां, जगांत वागणें ही एक मोठी लांबलचक परीक्षाच आहे. तींत मनुष्याकडून जसें आचरण होतें; तशी पदवी त्यास प्राप्त होते.

गुण संपादावे, ह्मणजे पदवी आपोआप प्राप्त होते; तिजकरितां वेगळे श्रम करावे लागत नाहींत. कां कीं, जन हें उत्तम पारखी आहे. त्यास चांगल्या वस्तु आवडतात; आणि चांगली वस्तु दृष्टीस पडली ह्मणजे तिचा योग्य उपयोग केल्यावांचून कोणी रहात नाहीं. इराणी भाषेमध्यें एक ह्मण आहे; तिचा अर्थ असा

आहे कीं, " भिंतीस उपयोगीं पडण्यासारखा दगड कोणी वाटेवर राहूं देत नाहीं. " हें खरें आहे. त्या दगडास परीक्षा द्यावी लागत नाहीं.

व्यवहारामध्यें मनुष्यांची परीक्षा आपोआप होते. आणि ज्यांची जशी योग्यता असते, तशीं तीं श्रेष्ठ किंवा कनिष्ठ होतात. शिकंदरबादशहा मरायास टेंकला, तेव्हां त्याला कोणीं विचारिलें कीं, "आपल्या पश्चात् आपलें राज्य कोणीं घ्यावें ?" त्यानें उत्तर दिलें, " ज्याची योग्यता सर्वांत मोठी असेल त्यानें. " ह्मणजे, राज्यव्यवहाराच्या परीक्षेंत जो सर्वांत श्रेष्ठ ठरेल त्यानें घ्यावें.

साधारणपणें परीक्षा देणें ह्मणजे आपण काय काय केलें आहे तें सांगणें किंवा दाखविणें. ह्या मानानें वेगळ्या वेगळ्या प्रकारच्या मनुष्यांस वेगळ्या वेगळ्या परीक्षा द्यावयाच्या असतात. परंतु, एक परीक्षा अशी मोठी आहे कीं, ती द्यावयास लागावयाची नाहीं, असें एक देखील मनुष्य नाहीं; आणि त्या परीक्षेंत कांहीं लपवितां यावयाचें नाहीं, कीं लबाडी चालावयाची नाहीं. ती परीक्षा ह्मणजे, मरणानंतर परमेश्वरापुढें आपल्या सर्व बऱ्यावाईट कर्मांची झडती द्यावी लागते, ती होय. ती केव्हां होईल ह्याचा नेम नाहीं. ह्मणून ती देण्यास नेहमीं सिद्ध असलें पाहिजे, तें सिद्ध राहाणें ह्मणजे हेंच कीं, निरंतर ईश्वराचें भय धरून चालणें.

अशी परीक्षा मरणानंतर आहे, असा सर्व धर्मशास्त्रांचा सिद्धान्त आहे. तरी कितीएक लंड असे आहेत कीं, ही परीक्षा, पाप, पुण्य, नरक, स्वर्ग, हीं मुळींच कांहीं नाहींत, असें ते ह्मणतात, आणि पाहिजेत

तसे वागतात. त्यांस आह्मी नास्तिक ह्मणतों. त्यांस आह्मी एवढेंच विचारितों कीं, मरणानंतरच्या गोष्टींचें प्रत्यक्ष ज्ञान जसें तुह्मांला नाहीं, तसें आह्मांलाहीं नाहीं, हें खरें आहे; पण तुह्मी ह्मणतां त्याप्रमाणें खरो-खरच तेथें कांहीं नसलें, तर बरें; पण जर, तें खरें असलें, तर मग तुमची गति कशी होईल? ह्यास्तव, ती परीक्षा आहे, असें खरें समजून तीस मान्य होण्यास निरंतर सिद्ध असावें, हा निर्भय मार्ग होय.

---

## ते बेटे खरें बोलतात; काय करावें?

नेहमीं खरें बोलावें, असें साधुजन सांगतात; परंतु, कितीएक प्रसंगीं मनुष्यांस खरें बोलणें सहन होत नाहीं.

मासिडोन देशाचा राजा फिलिप ह्यानें इ० स० पूर्वीं ३४८वे वर्षीं ओलिंथस ह्या नांवाचें एक शहर अथेन्स-करांपासून घेतलें. तें लढून घेतलें नाहीं; तर, त्या शह-रांतल्या मुख्य दोन अमलदारांस पुष्कळ द्रव्य देउन, त्यांस फितूर करून घेतलें. त्या अमलदारांतल्या ए-काचें नांव युथिक्रिटस होतें, आणि दुसऱ्याचें नांव ला-स्थिनीस होतें. ह्या दोघां पुरुषांनीं, द्रव्यलोभास वश होऊन, आपल्या शहरच्या लोकांचा विश्वासघात केला, ही गोष्ट तेव्हांच चोहींकडे प्रसिद्ध झाली, आणि तीव-रून सगळे लोक, ह्मणजे फिलिप राजाच्या लष्करांतले शिपाईसुद्धां त्यांची छिः थू करूं लागले. हें त्या दो-घांस अत्यंत लज्जास्पद झालें; आणि, त्याविषयीं कांहीं बंदोबस्त व्हावा, ह्मणून त्यांनीं ती गोष्ट फिलिप राजाच्या कानावर घातली. तेव्हां त्यानें चारचौघांसमक्ष उत्तर

दिलें, "अहो, तुह्मी तिकडे लक्ष देऊं नका; ते सगळे गाढव आहेत; ते बेटे खरें बोलतात; काय करावें?" हे त्या राजाचे शब्द, त्या छिः थूच्या लक्षपट त्यांच्या अंतःकरणांस केवळ बाणांसारखे टोंचले.

पातकापासून जें दुःख होतें, त्याच्या निवारणाचा उत्तम उपाय काय तो एकच आहे; आणि तो उपाय पश्चात्ताप होय. त्या कामीं दुसऱ्या उपायांची योजना केली, ह्मणजे तें दुःख वाढतें, कमी होत नाहीं.

---

## मनुष्याचें आयुष्य.

शोधक पुरुषांनीं असें अनुमान काढिलें आहे कीं, एकंदर जितकीं मनुष्यें जन्मास येतात, तितक्यांतलीं चवथा हिसा मनुष्यें ७ वर्षांचीं होण्यापूर्वीं मरतात; अर्धीं १७ वर्षांचीं होण्यापूर्वीं मरतात; आणि त्यांतून पार पडून जीं वांचतात, तीं पुढें बरींच वर्षेंपर्यंत जगतात. १००० मनुष्यांत एक मनुष्य शंभर वर्षेंपर्यंत जगतें; १०० मनुष्यांत सहा मनुष्यें पांसष्ट वर्षांचीं होतपर्यंत जगतात; आणि ५०० मनुष्यांत एक मनुष्य ऐशीं वर्षेंपर्यंत जगतें. सगळ्या पृथ्वीच्या पाठीवर एकंदर सुमारें १०००००००००० मनुष्यें आहेत. ह्यांतलीं ३३३३३३३३३ दर वर्षांस मरतात; ९१८२४ दररोज मरतात, ३७३० दर तासास मरतात; आणि ६० दर मिनिटास मरतात; ह्मणजे सेंकंडास एक पडलें. मनुष्याच्या उत्पत्तीचा क्रमही असाच विलक्षण आहे; किंबहुना थोडा अधिक आहे. परंतु, लढाया, दुष्काळ आणि भयंकर रोग, ह्यांच्या योगानें पुष्कळ क्षय होऊन जमा आणि खर्च हीं बहुधा सारखीं होतात.

---

# बालबोध.

## जार्ज वाशिंग्टन.



स्वदेशाचें हित साधून ज्या महात्म्यांनीं आपल्या जन्माचें सार्थक्य केलें आहे, ते अत्यंत वंदनीय होत. जे इंग्लिश लोक इंग्लंडांत त्रासून स्वेच्छेप्रमाणें स्वस्थपणानें कालक्रमणा करण्याकरितां, कितीएक वर्षेंपर्यंत अमेरिकेंत जाऊन राहिले होते, त्यांस, इंग्लंडांतील सरकाराच्या सेवकपणांतून मुक्त करून, स्वतंत्र करण्याच्या कामीं अगदीं निरपेक्ष बुद्धीनें परिश्रम केल्यावरून, जार्ज वाशिंग्टन ह्याचें नांव अजरामर झालें आहे त्याचा संक्षिप्त वृत्तांत येथें लिहितों.

जार्ज वाशिंग्टन हा उत्तर अमेरिकेंत वेस्टमोलँड प्रांतांत इ० स० १७३२ ह्या वर्षीं जन्मला. तो सात वर्षांचा होता, तेव्हां त्याला शाळेंत घातलें. तेथें तो आपल्या एवढ्या मुलांच्या पलटणी करून लढायांचे खेळ खेळत असे. आणि तो मोठा उद्योगी, सत्यशील, आणि निर्लोभ, अशी त्याची ख्याति होऊन, त्याच्या विसाव्या वर्षीं त्याला त्या प्रांताच्या लष्करांत एक लहानशी अमलदारी मिळाली. त्यानंतर थोडक्या दिवसांनीं फ्रेंच लोकांशीं लढण्याचा प्रसंग आला. त्यांत ह्या तरुण योद्ध्याचें चातुर्य दिसून आलें, आणि त्याची कीर्ति चोहींकडे पसरली. पुढें, इंग्लंडांतलें सरकार अमेरिकेंतल्या इंग्लिश लोकांवर कर बसवूं लागलें; आणि, ज्या पक्षीं आमच्या वतीचे लोक पार्लमेंटांत नाहींत, त्या पक्षीं आह्मी कर देणार नाहीं, असा आग्रह त्या लोकांनीं धरिला. त्यावरून फार मोठें युद्ध मांडलें. इंग्लंडच्या सरकारास जर्मन सरकारानें साह्य केलें; आणि अमेरिकेंतल्या इंग्लिश लोकांस फ्रेंच सरकारानें साह्य केलें. ह्यांच्या लढाया आठ वर्षेंपर्यंत चालल्या होत्या. त्यांत जार्ज वाशिंग्टन ह्यानें अनेक पराक्रम केले. शेवटीं, त्याला मुख्य सेनापति नेमिल्यावर, इंग्लंडच्या सैन्याचा अगदीं पराभव झाला; आणि, आपण इंग्लंडापासून अगदीं स्वतंत्र आहों, असा जगविख्यात जाहीरनामा अमेरिकन लोकांनीं इ० स० १७७६ त प्रसिद्ध केला; आणि तें त्याचें स्वतंत्रपण, इ०स० १७८३त इतर सर्व राष्ट्रांनीं कबूल केलें. नंतर वाशिंग्टनानें आपले कामाचा राजीनामा दिला.

ह्या प्रकारेंकरून अमेरिकेंतलीं जीं संस्थानें स्वतंत्र

झालीं, त्यांचा राज्यकारभार चालविण्यास कांहीं नियमित कालपर्यंत त्यांतलाच कोणी थोर पुरुष सर्वानुमतें नेमावा असें ठरलें. त्याप्रमाणें वाशिंग्टन ह्यास इ० स० १७८९त त्या कामावर नेमिलें, आणि त्यास “अध्यक्ष” असें ह्मणूं लागले. हें राज्यकारभाराचें काम ह्या पुरुषानें इ० स० १७९६ पर्यंत फार उत्कृष्ट रीतीनें चालवून, मग राजीनामा दिला. ह्यानंतर त्यानें आपलें आयुष्य, स्वस्थपणें, आपल्या वडिलोपार्जित जमीनजुमल्यांत शेतपोत करून घालविलें. तो इ० स० १७९९त मरण पावला. तेव्हां त्याचें वय ६७ वर्षांचें होतें.

हा पुरुष अत्यंत सद्गुणी आणि धर्मशील होता. ह्याची निर्लोभता वर्णनीय होती. मुख्य सेनापतीच्या आणि अध्यक्षाच्या कामावर असतां, त्यानें आपल्या देशाच्या सरकाराकडून, खाणेंपिणें आणि वस्त्रप्रावर्ण ह्यांस जेवढा अगदीं नक्की खर्च लागला, तेवढा मात्र घेतला, शिलकेस ठेवण्यास एक पै देखील अधिक घेतली नाहीं. **स्वदेशाभिमान** हा त्याच्या सद्गुणमणिमालेचा मेरु होता. कायावाचामनेंकरून तो आपल्या राष्ट्राचें हित करण्यास झटला; आणि त्यांत त्याला उत्तम यश आलें. ज्यांस जगाचा इतिहास येत आहे, ते सर्व, वाशिंग्टनाचें नांव ऐकून पूज्यबुद्धिपूर्वक माना तुकावितात. आमच्या ह्या राष्ट्राचें खरें हित होण्यास ह्यामध्यें वाशिंग्टनासारखे महात्मे निर्माण झाले पाहिजेत.

## खरें बोलणें

### श्लोक.

खरें बोलणें फार सोपें मनाला
तयाला नको ज्ञान वा युक्तिमाला
खरें इंद्रियां ज्ञान होईल जैसें
कथावें यथाबुद्धि तें नित्य तैसें. १.
मनीं एक ठेवूनि दूजें कथाया
नवा व्यूह लागे लबाडां रचाया
तया लागती मानसा कष्ट भारी
गढावें पडे खोल मोठ्या विचारीं. २.
तसेंही करोनी पुन्हां नित्य भीती
न पाती कुणी होय लोकीं फजीती
गमे लाभ तो नाश ये प्रत्ययासी
असत्या त्यजा ही अहो रीति खाशी. ३.
खरें बोलतां या जगीं मान होतो
तसा सांगतीं देवलोकांत हो तो
ह्मणोनी भले बोधिती या जनाला
सदा सत्य जें तेंचि बोलावयाला. ४.
अहो बालकांनो सदा सत्य बोला
जना ईश्वरा तोषवा आणि डोला
चढा या पथें साधिया थोर तोला
तयाच्या नसे साम्यता अन्य मोला. ५.

---

## व्यवहारज्ञान.

मोतीं पारखतां येणें हें धान्य पारखतां येण्यापेक्षां श्रेष्ठ आहे; आणि ग्रंथ लिहितां येणें हें साधारण चि-

टीचपाटी लिहितां येण्यापेक्षां श्रेष्ठ आहे; हें अगदीं खरें आहे. त्याप्रमाणेंच शास्त्रीय विषयांचें गहन ज्ञान हें, सामान्य व्यवहारज्ञानापेक्षां श्रेष्ठ आहे, हेंही खरें आहे. परंतु, जगाच्या नित्याच्या कामकाजांत धान्याची पारख, चिटीचपाटी लिहितां येत असणें, आणि सामान्य व्यवहारज्ञान, हीं जशीं पदोपदीं मनुष्याच्या उपयोगीं पडतात, तशीं, मोत्यांची पारख, ग्रंथ लिहितां येणें, आणि शास्त्रीय विषयांचें गहन ज्ञान, हीं उपयोगीं पडत नाहींत. मोत्यांची पारख करण्याचा प्रसंग मनुष्यास फार क्वचित् येतो; परंतु, धान्यादिकांच्या पारखीचें काम झटलें ह्मणजे बहुधा दररोज पडतें. ह्मणजे तेंच व्यवहारज्ञान. तें कोठें एका ठिकाणीं सांपडावयाचें नाहीं. तें ग्रंथांतरीं आणि जनांच्या सर्व व्यवसायांत भरलें आहे. तें संपादण्याचें उत्तम साधन झटलें ह्मणजे लक्षपूर्वक अवलोकन होय.

ज्या प्रसंगीं जसें वागायास पाहिजे, त्या प्रसंगीं तसें वागून, अन्यायाच्या मार्गानें न जातां, आपलें इष्ट साधणें, हें व्यवहारज्ञानाचें उत्तम फल होय. ह्यालाच कोणी व्यवहारचातुर्य ह्मणतात. एकादा वेळ असा प्राप्त होतो कीं, तेव्हां विद्वान मनुष्याचें तत्त्वज्ञान कांहीं एक उपयोगीं न पडतां, त्याच्या केवळ व्यवहारचातुर्यानें फार मोठें काम होतें.

शिकंदरबादशहा मोठ्या सैन्यासहवर्तमान दिग्विजय करायास निघाला. तो ल्यांपसाकस नांवाच्या एका शहराजवळ आला. तत्पूर्वींच, त्या शहराच्या लोकांनीं बंडावा केला होता, आणि त्यामुळें त्याला त्या सर्वांचा

फार राग आला होता. त्या शहराजवळ आपल्या लष्करांत शिकंदर बसला असतां, त्या शहरांतला, आनाक्षिमिनीज ह्या नांवाचा एक मोठा विद्वान वृद्ध पुरुष, नीट आपणाकडे येत आहे, असें त्यानें पाहिलें; आणि तो, फिलिप राजाचा परम मित्र, आणि त्याचा स्वतःचा गुरु होता, हें त्यास आठवून, त्याच्या मनांत आलें कीं, आपल्या शहराच्या रक्षणाविषयीं भीड घालण्याकारितां हा पुरुष आपणाकडे खचीत येत आहे, आणि ह्यानें शब्द टाकल्यावर ह्याचें ऐकणें भाग पडेल. ह्यास्तव, तें टाळण्यास, त्यानें, त्याची विनंती मान्य न करण्याविषयीं, आपल्या सरदार लोकांसमक्ष शपथपूर्वक प्रतिज्ञा केली. तें आधीं जाणून, आनाक्षिमिनीज ह्यानें त्याच्या दरबारांत येऊन त्यास ह्मटलें, "आपणांस माझी विनंती मिळून एवढीच आहे कीं, आपण ल्यांपसाकस शहराचा अगदीं विध्वंस करून टाकावा." ती विनंती शिकंदरास, आपल्या शपथेप्रमाणें अमान्य करणें भाग पडलें, आणि तेणेंकरून त्या शहरचा बचाव झाला.

नादिरशहानें दिल्ली घेतली, त्या वेळीं तेथें महमदशहा हा बाहशहा होता. त्या दिवशीं ते दोघे बादशहा दिवाणखान्यांत बोलत बसले असतां, चहाची वेळ झाली. तेव्हां चहाचा प्याला आधीं कोणापुढें करावा, ह्याविषयीं महमदशहाच्या सेवकांस मोठा विचार पडला. कां कीं, तो जर महमदशहाला द्यावा, तर नादिरशहास क्रोध येऊन तो कदाचित् आपलें डोकें मारील; आणि तो जर नादिरशहास द्यावा, तर शत्रूच्या भयानें एका दिवसांत निमकहराम झाल्याचा दोष माथीं येणार;

असे विचार त्यांच्यामध्यें घोळूं लागले. तो घोंटाळा पाहून त्यांतल्या एका वृद्ध मनुष्यानें त्यांतला एक पेला हातांत घेऊन, तो महमदशहाच्या पुढें केला, आणि नादिरशहाकडे तोंड करून ह्मटलें, "महाराज, हे महाराज आपलेकडचे पाहुणे आहेत; ह्यांच्या पुढें पेला करण्याची योग्यता माझी पामराची नाहीं." तें ऐकून, तो पेला महमदशहानें नादिरशहाकडे केला. ह्या युक्तीनें उभयतांसही संतोष झाला.

अशा प्रकारें वागणें हें व्यवहारचातुर्य होय. आतां ह्याच्या उलट पहा. कितीएक मुलांस भोजनसमारंभांत श्लोक आर्या ह्मणण्याची फार आवड असते. ती फार चांगली आहे. पण, तेव्हां जें ह्मणायाचें, तें प्रसंगास शोभेल असें ह्मणावें, हें त्यांस कळत नसल्यामुळें, आणि अर्थाविषयींच्या अज्ञानामुळें, ते भलत्या वेळीं भलतेंच ह्मणतात. घराच्या वास्तुशांतीच्या भोजनसमारंभांत—

"येउनि एक्या कपिनें होळी केली समग्र सदनाची"

ही आर्या ह्मणतात; किंवा एकाद्या लग्नाच्या भोजनसमारंभांत—

"प्रभुनें यापरि तुमचा जांवाई आणि खपविला व्याही"

ही आर्या ह्मणतात.

हें अप्रयोजकपण आहे. हें आपले हातून न होऊं देण्याविषयीं जपावें.

---

## सत्कृत्यें.

सत्कृत्यें करायास लागल्यास थोडा वेळ झाल्यावर, तीं करायास सोपीं होतात; तीं करायास सोपीं झाल्या-

वर त्यांपासून आनंद प्राप्त होतो; आनंद प्राप्त होऊं लागला ह्मणजे, तीं आपण वारंवार करितों; तीं वारंवार करूं लागलों, ह्मणजे आपणांस त्यांची संवय लागते; ती संवय आंगीं खिळली ह्मणजे, ती अगदीं स्वभावासारखी होते; आणि ती स्वभावासारखी एकदा होऊन गेली, ह्मणजे तीं कृत्यें केल्यावांचून आपल्याच्यानें राहवत नाहीं. कधीं कधीं तर तीं आपल्या हातून, बुद्ध्या प्रयत्न न करितां, सहज होतात.

## सद्गुणी होणें.

सद्गुणी मनुष्य आपणांपासून कितीही दूर असो, आणि त्याच्या सद्गुणांपासून आपणांस कांहींएक लाभ होवो कीं न होवो, त्याविषयीं पूज्यबुद्धि आपले ठायीं उत्पन्न होते; एवढेंच केवळ नव्हे, तर ज्या सद्गुणी पुरुषांस मरून आज सहस्त्रावधि वर्षें झालीं आहेत, त्यांच्या कथा वाचून आज आपणांस ते अत्यंत पूज्य वाटतात; ह्याहून विशेष चमत्कार असा आहे कीं, सद्गुण आपल्या हाडवैऱ्याचे ठायीं जरी असला, तरी, तेवढ्यापुरती त्याची स्तुति केल्यावांचून आपणाच्यानें राहवत नाहीं. ह्यावरून सद्गुणी होणें हें किती चांगलें आहे तें पहा. !

## गणितप्रश्न.

(१) कांहीं मुलगे एका दुकानांत गेले; आणि, त्यांतल्या पहिल्यानें एक, दुसऱ्यानें दोन, तिसऱ्यानें तीन, चवथ्यानें चार, अशा गोट्या विकत घेतल्या. नंतर ते सगळे खेळायास बसले. त्यांत हारजिंक होतां होतां, शेवटीं पाहतात तों, दरएक मुलाजवळ नऊ नऊ गोट्या आल्या; तर, एकंदर मुलगे किती, आणि गोट्या किती?

# बालबोध.



## डाक्टर भाऊ दाजी.



विद्वान पुरुष हीं रत्नें होत; एवढेंच केवळ नव्हे; तर त्यांची योग्यता रत्नांच्या योग्यतेपेक्षां पुष्कळ अधिक आहे. पहा. रत्नाचा प्रकाश कायतो त्याच्या भोंवतीं मात्र पडतो, आणि तें नाहींसें झालें कीं, तो नाहींसा होतो; परंतु, विद्वानांची कीर्ति जी आहे, ती, सहस्रावधि कोसपर्यंत सगळ्या पृथ्वीभर पसरून, ते जरी स्वतः परलोकवासी झाले, तरी मागें राहते. डाक्टर भाऊ दाजी हें अशा रत्नांपैकींच एक रत्न होऊन गेलें. त्याची संक्षिप्त कथा अशी आहे.

भाऊ ह्यांचें जन्म इ० स० १८२१ ह्या वर्षी, सावंतवाडीजवळ मांजरें ह्या गांवीं झालें. त्यांचे वडील दाजीबा हे मातीचीं चित्रें करीत असत, आणि त्यांच्या व्यापारावर आपला संसार चालवीत असत. ते, इ० स० १८३६ च्या सुमारास मुंबईस आले, आणि मातीचा नवनारीकुंजर करून, एका एका पैशावर तो लोकांस दाखवून, त्यावर निर्वाह करूं लागले. तेव्हां त्यांच्या बरोबर भाऊ आणि नारायण हे त्यांचे मुलगे होते. भाऊंनीं मुंबईच्या शाळांत अभ्यास मोठ्या कष्टानें आणि आस्थेनें केला, अशा गोष्टी पुष्कळ प्रसिद्ध आहेत. त्यांचा विद्याभ्यास येथील ग्रांट मेडिकल कालेजांत इ० स० १८५१ त समाप्त झाला, आणि वैद्यविद्येंत निपुण होऊन ते वैद्यकी करूं लागले. त्यांचा मुख्य आवडीचा आणि धंद्याचा विषय जरी वैद्यक हा होता, तरी, त्यांना इतर सर्व विषयांची अभिरुचि एकसारखी होती. त्यांच्या भरज्वानीच्या वेळीं त्यांचें काम फार उत्कृष्ट चाललें, आणि त्यावर त्यांनीं लाखों रुपये मिळविले. सर्व जातीच्या लोकांवर एकसारखा लोभ ठेवणें, फार द्रव्यलोभ न धरणें, आणि गरीबांस साह्य करण्याची हौस असणें, हे गुण त्यांच्या ठायीं पूर्णपणें असल्याच्या योगानें त्यांस सर्व जातींचे लहानमोठे लोक एकाद्या मोठ्या साधूप्रमाणें एकनिष्ठपणें भजत असत. त्यामुळें त्यांना त्या संधीस कांहीं कमी पडलें नाहीं. त्यांचा राहण्यासवरण्याचा थाट एकाद्या मोठ्या उमरावासारखा असे.

हे वैद्यकींत फार कुशळ होते. ह्यांचे हातून सहस्रा-

वधि लोक अनेक प्रकारच्या भयंकर रोगांपासून मुक्त झाले. मुतखडा होऊन मरायास टेंकलेले असे एकंदर दीडशें रोगी, ह्यांनीं, ते खडे काढून टाकून बरे केले.

रक्तपिती हा अत्यंत भयंकर रोग आहे. ह्यावर औषध कोणाला ठाऊक नव्हतें. तें डाक्टर भाऊ ह्यांनीं स्वबुद्धीनें शोधून काढिलें; आणि त्याच्या योगानें, त्या प्रकारच्या रोग्यांस पुष्कळ गुण आला. ही त्यांची कीर्ति युरोपखंडांतही पसरली.

जुने शिलालेख, ताम्रपट्ट, इत्यादिकांचा शोध करावा, आणि त्यांवरून देशाच्या इतिहासास भर घालावी, हा त्यांचा मोठा हव्यास होता. त्याच्या योगानें पुष्कळ लाभ झाले आहेत. असें सांगतात कीं, अर्धांगवायु होऊन त्यांस जागेवरून हालवत नव्हतें, अशा वेळेस त्यांस असें कळलें कीं, हिमालयामध्यें गंगोत्रीजवळच्या एका उंच शिखरावर कांहीं एक शिलालेख आहे. तेव्हां ते ह्मणाले, "तो पाहायास जाण्यास जर मला सामर्थ्य असतें, तर किती चांगलें झालें असतें ह्मणून सांगूं!" ह्यालाच ह्मणावें विद्याव्यसन.

हे गृहस्थ अर्धांगवायूनें कितीएक महिने आजारी पडून, शेवटीं अतिसार होऊन, इ० स० १८७४ च्या मे महिन्याच्या अखेरीस मरण पावले. तेव्हां ह्यांचें वय ५२ वर्षांचें होतें. ते चांगले धडेखडे राहून जर आणखी पांचपंचवीस वर्षें जगते, तर रक्तपितीवरच्या औषधाची योजना पूर्ण झाली असती, आणि जगांतून तो रोग समूळ नाहींसा केल्याचें यश त्यांस खचीत मिळालें असतें. परंतु, ईश्वरी संकेत तसा नव्हता, त्यास उपाय

नाहीं. तथापि, भाऊंनीं जें हें काम अर्धें करून ठेविलें आहे, तें, तसा दुसरा कोणी पुरुष आमच्यांत उत्पन्न होऊन पूर्ण करील, आणि तें औषध शोधून काढिल्याचें सर्व यश आमच्या ह्या राष्ट्रास मिळेल, अशी आह्मांस आशा आहे.

---

## नारायणराव आणि सुमेरसिंग.

### आर्या.

छीछी सुमेरसिंगा, क्षणभर कर आंवरोनि घे मागें,
मीं काय तुझा केला, अपराध प्रथम तें मला सांगें. १.
तूं आमुचा पुरातन, सेवक विश्वासनिधि असोनि खरा,
मज मारावें स्वकरें, हा दिसतो काय तुज विचार बरा. २.
रे कांहीं आण मनीं, मी ब्राह्मण मी नृपाल हें नातें,
नाहीं तुला दुखाविलें, कधीं उगा मारितोसि कां मातें. ३.
ज्याचें खावें त्यावर, उठणें हें पाप काय सामान्य,
तें नरकपतनसाधन; सुज्ञ जन कधीं नसे तथा मान्य. ४.
मज जीवदान दे तुज, देइन मी मागशील तें आतां,
मी तुज पदर पसरितों, पायां पडतों नको करूं घाता. ५.
श्रीमंत तुह्मीं माझ्या, नाहीं केलें मुळींच अन्याया,
परि तुमचा वध केल्या विण गति दासा न होय अन्या या. ६.
ब्राह्मण मज पूज्य तसे, नृपाल, माझे तुह्मी तुह्मां नमितों,
परि निरुपाय ह्मणोनी, तुह्मां वधायास शस्त्र हें धरितों. ७.
लत्ताप्रहार सर्पा, करोनियां सोडणें मरणमूळ,
हें जाणोनि कशाला, खाऊं विष ह्मणुनियां बळें गूळ. ८.
लोभानें मज गिळिलें, गुंतविलें मज विचित्र भाकेला,
तीनेंच वळविलें मज, पापीं मम घात हाय हा केला. ९.

येऊनि येथवर जर, यापुढती मी तुह्मां न मारीन,
तरि घात घडुनि वरतीं, शपथेचें होय मस्तकीं रीण. १०.
हीं दोन नकोत पुरे, एक घडो नाश तो प्रखरतर कीं,
हाणोनी शपथेला, लाथ कशाला बुडूं सदा नरकीं. ११.
आतां वेदान्त पुरे, क्षमा महाराज हो करा याला,
वचनानुरूप वर्तन, सरतों पुढती त्वरें करायाला. १२.

---

## दुर्बिणीचा शोध.

मुलें जशीं वयानें लहान असतात, तसे त्यांचे विचारही लहानच असतात; ह्मणून कितीएक प्रौढ मनुष्यांस त्यांजकडे लक्ष देणें हें पोरकटपण वाटतें. परंतु, तें बरोबर नाहीं. कोणत्या वस्तूविषयीं काय चमत्कार केव्हां कोणाच्या लक्षांत येईल, ह्याचा नेम नाहीं. ह्यास्तव मुलांच्या ह्मणण्याचा देखील विचार करावा, हें योग्य आहे; हें पुढील गोष्टीवरून स्पष्ट दिसून येईल.

आलीकडे जीं अनेक चमत्कारिक यंत्रें तयार केलीं आहेत, त्यांत दुर्बीण ह्मणून एक यंत्र आहे. त्याचा उपयोग एवढाच कीं, त्याच्या योगानें दूरचा पदार्थ अगदीं जवळ दिसतो. तें यंत्र तयार करण्याची युक्ति आरंभीं एका अगदीं लहान मुलीच्या सूचनेवरून मनांत आली. तिची हकीकत अशी.

युरोपखंडांत हालंड देशाजवळ वालचर्न ह्मणून एक बेट आहे. त्या बेटांत मिडसबर्ग ह्मणून एक गांव आहे. तेथें हान्सलिपर्शीन ह्या नांवाचा एक चष्मे करणारा रहात असे. तो गरीब होता. तो एके दिवशीं आपल्या कामांत गुंतला असतां, आणि त्याची लहान मुल-

गी त्याच्या हत्यारांशीं आणि भिंगांशीं नित्याप्रमाणें खेळत असतां, सहज दोन भिंगें एकापुढें एक धरून, त्यांतून जवळच्या देवळाच्या घुमटाकडे पाहून, ती मोठ्या घाईनें ह्मणाली, "बाबा, बाबा, हा घुमट किती जवळ आला हो! पहा तर खरा!" हे शब्द कानीं पडतांच तो त्या मुलीजवळ आला, आणि तिनें तीं भिंगें कशीं धरिलीं होतीं तीं पाहिलीं; आणि त्यांतून तो खरोखरच त्याला अगदीं जवळ दिसला. त्याविषयीं विचार करून पाहिल्यावर त्याला असें दिसून आलें कीं, त्यांतलें एक भिंग एके बाजूनें सपाट आणि दुसऱ्या बाजूनें खोलगट असें होतें; आणि दुसरें भिंग एके बाजूनें सपाट आणि दुसऱ्या बाजूनें पुरीसारखें फुगलेलें किंवा वर आलेलें होतें; आणि त्यांतून किरण पार जाण्याच्या बिंदूंचा मेळ एकमेकांशीं सहजगत्या पडल्यामुळें, हा चमत्कार झाला.

त्यावरून युक्ति बसवून मोठ्या विचारानें आणि कुशलतेनें त्यानें तीन दुर्बिणी तयार करून, त्या, इ० स० १६०८ ह्या वर्षीं आपल्या देशाच्या राजाकडे पाठविल्या. त्यांवरून त्याची मोठी वाहवा झाली. त्या युक्तीवर आणखी पुष्कळ दुसऱ्या युक्ति निघून आतां एवढ्या मोठ्या दुर्बिणी तयार केल्या आहेत कीं, त्यांतून आकाशांतले सूर्य, चंद्र, ग्रह आणि इतर तारे हे अगदीं स्पष्ट दिसतात, आणि त्यांच्या गतिही समजतात. ह्या यंत्राच्या योगानें ज्योतिषशास्त्रांत पुष्कळ नवनवे शोध झाले आहेत.

आतां, ह्या शोधाचें श्रेय त्या मुलीला मिळावें, कीं ज्यांनीं शोध लाविले त्यांस मिळावें? आह्मी ह्मणतों

त्या मुलीस मिळावें. कां कीं, तिचें बोलणें हें बीज, आणि विद्वानांचे उद्योग हा महावृक्ष होय. बीजच जर नसतें, तर वृक्ष कोठून होता ?

अशा प्रकारच्या मुलांच्या खेळांतल्या गोष्टी देखील लक्षपूर्वक पहाव्या. त्यांतून कदाचित् असे चमत्कार किती निघतील, हें कोणी सांगावें?

---

## " अरे ! हीं मोत्यें ! हीं कशाला !"

आपल्या पहाण्यांत ज्या सहस्रावधि वस्तु येतात, त्यांमध्यें कितीएक अशा आहेत कीं, त्या स्वतःसिद्ध मनुष्याच्या उपयोगीं पडतात; ह्मणजे, त्या उपयोगीं पडण्यास मनुष्यास दुसऱ्या कोणाचीही गरज लागत नाहीं; आंबा, अंजीर, जांब, नारिंग इत्यादि फळें आणि गहूं, तांदूळ इत्यादि धान्यें ह्या वस्तु ह्या प्रकारच्या होत. परंतु, कितीएक वस्तु अशा आहेत कीं, भोंवतालीं मनुष्यांचा सहवास असल्यावांचून, एकट्या मनुष्यास, त्या कधींही उपयोगीं पडावयाच्या नाहींत; सोनें, रुपें, मोत्यें, रत्नें, हिरे, इत्यादि वस्तु ह्या दुसऱ्या प्रकारच्या होत. ह्यावरून स्वतःसिद्ध उपयोगी वस्तूंची योग्यता, मनुष्याच्या सहवासांत मात्र उपयोगीं पडणाऱ्या वस्तूंच्या योग्यतेपेक्षां मोठी आहे, असें उघड झालें. अथवा असें ह्मणावें कीं, पहिल्या प्रकारच्या वस्तूंचा उपयोग स्वाभाविक, किंवा ईश्वरदत्त आहे; आणि दुसऱ्या प्रकारच्या वस्तूंचा उपयोग मनुष्यांनीं कल्पिलेला आहे.

एक आरब एके वेळीं रानांत वाट चुकला. त्याच्या जवळची पोटगी थोडक्या वेळांत सरून गेली; आणि

त्याला खडखडीत उपास पडूं लागले. तो फिरत फिरत एका मैदानांत आला; आणि तेथें पाहूं लागला तों, तेथले तंबू वगैरे नुकतेच उपटलेले आहेत, असें त्याच्या दृष्टीस पडलें; आणि त्याला अशी आशा उत्पन्न झाली कीं, निघून गेलेल्या प्रवाशांनीं टाकून दिलेला शिळापाका भाकरतुकडा आपणास सांपडेल; परंतु ती आशा निष्फळ झाली. त्याला भाकरीचा एक कुटका देखील सांपडला नाहीं. तो निराश होऊन, बारीक दृष्टीनें इकडे तिकडे पहात असतां, त्याला एकाएकीं एक लहानशी पिशवी दिसली. ती चटकर वर उचलून त्यानें पाहिली तों, तिचें तोंड गच्च बांधलेलें आहे, आणि तींत कांहीं कठिण वस्तु खचून भरल्या आहेत, असें त्याला आढळलें. आणि त्याच्या मनांत असें आलें कीं, त्या खारका असाव्या. ह्मणून, मोठ्या आशेनें आणि लगबगीनें त्यानें त्या पिशवीचें तोंड उघाडिलें, आणि पहातो तों, तींत मोठमोठीं मोलवान मोत्यें भरलीं आहेत, असें त्याच्या दृष्टीस पडलें. त्यांजकडे पाहून, आणि तीं जमिनीवर आदळून तो ह्मणाला, "अरे हीं मोत्यें! हीं मला काय करायाचीं आहेत!" पुढें त्याच्यानें चालवेना. ह्मणून तो तेथें टेंकला, आणि त्या ठिकाणीं अन्नअन्न करून मरण पावला.! लाख रुपयांचीं मोत्यें जवळ पडलीं होतीं, त्यांच्या योगानें त्याचा जीव वांचला नाहीं; ह्याच जर आण्या दोन आण्यांच्या तितक्या खारका असत्या, तर त्याचा जीव खचीत जगला असता.

---

## मागच्या अंकांतील प्रश्नाचें उत्तर.

१७ मुलगे होते, आणि १५३ गोष्या होत्या.

# बालबोध.



## ग्ल्याडस्टन साहेब.



हे आपल्या महाराणीसाहेबांचे सांप्रतचे मुख्य प्रधान होत. सध्या महाराणीसरकारचा अंमल ज्या देशांवर चालत आहे, त्यांचें एकंदर क्षेत्रफल८९,८२,१७७ चौरस मैल आहे; त्यांत लोकसंख्या ३०,५४,००,००० आहे, आणि त्यांचें उत्पन्न १,९१,५२,७०,००० रुपये आहे; एवढ्या मोठ्या राज्यामध्यें, अधिकाराच्या मानानें, महाराणीसाहेबांच्या खालोखाल ह्मटले ह्मणजे हे गृहस्थ आहेत. ह्यांचा संक्षिप्त वृत्तांत येणेंप्रमाणें.

इंग्लंड देशामध्यें लिव्हर्पूल ह्मणून एक मोठें शहर आहे. तेथें सर जान ग्ल्याडस्टन ह्मणून कोणी एक

व्यापारी पूर्वी राहत असे. त्याचे चिरंजीव हे ग्ल्याडस्टन साहेब होत. हे इ० स० १८०९ ह्या वर्षाच्या डिसेंबर महिन्याच्या २९ व्या तारखेस जन्मले. ते बारा वर्षांचे होण्याच्या आधींच ईटन विद्यालयांत जाऊं लागले, आणि तेथें त्यांनीं सहा वर्षें अभ्यास केला. तेथें असतां त्यांस विद्येची अभिरुचि फार लागली, आणि प्राचीन भाषांविषयींची त्यांची आवड प्रगट झाली. त्यांनीं तेथें एक लहानसें मासिक पुस्तक काढून, तें कितीएक दिवसपर्यंत फार चांगल्या रीतीनें चालविलें. ग्ल्याडस्टन साहेब ईटन विद्यालयांतून निघून आक्सफोर्डच्या पाठशाळेंत गेले. तेथें त्यांनीं चार वर्षेंपर्यंत अभ्यास केला. त्या पाठशाळेमध्यें विद्यार्थ्यांची एक सभा असे. तिजमध्यें हे चांगलीं भाषणें करीत; त्यांवरून त्यांच्या वक्तृत्वाची फार आख्या असे. ते लहानपणापासून मोठे मेहनती विद्यार्थी असत. त्यांविषयीं एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, "ते पाठशाळेंत असोत किंवा कोठें घरीं असोत; दिवसा दहा वाजल्यापासून दोन वाजत पर्यंत, ते आपल्या विद्याभ्यासांत अगदीं मग्न असत, आणि त्या वेळांत ते कधीं कोणास भेटत नसत. आपल्या वयाच्या अठराव्या वर्षापासून तों एकविसाव्या वर्षापर्यंत, हे दररोजचे चार मोलवान तास, प्रवासांत असत ते दिवस खेरीज करून, त्यांनीं कधींही अभ्यास केल्यावांचून जाऊं दिले नाहींत." ज्ञानसंपादन हा त्यांचा आवडता उद्योग आहे. आणि, त्यांस जरी इतर पुष्कळ मोठमोठीं कामें करावयाचीं असतात, तरी, ह्या उद्योगांत ते खंड पडूं देत नाहींत.

इ० स० १८३१ ह्या वर्षीं त्यांची सर्वांत मोठी शे-वटची परीक्षा उतरली, आणि त्यांची फार वाहवा झा-ली. नंतर एक वर्षभर त्यांनीं इतर देश पाहण्याकरितां युरोपखंडांत प्रवास केला. ह्याच्या पुढच्या वर्षीं ह्मणजे इ० स० १८३२ त न्यूयार्क प्रांताच्या लोकांनीं आ-पल्या वतीनें त्यांस पार्लमेंटाचे सभासद नेमिलें. तेव्हां-पासून ह्या वेळापर्यंत, ह्मणजे आज एकावन वर्षें हे गृ-हस्थ पार्लमेंट सभेंत आहेत. ते सध्या मिडलोथियनाच्या वतीचे सभासद आहेत.

हीं गेलीं पन्नास वर्षें त्यांनीं सरकारी कामांत घाल-विलीं आहेत. ते प्रथम इ० स० १८३४ त सरकारी कामगार झाले; आणि, चढत चढत, इ० स० १८६८त महाराणीसाहेबांचे मुख्य प्रधान झाले. तें काम पांच वर्षें चालविल्यावर त्यांनीं सोडिलें. पुनः इ० स० १८८० ह्या वर्षीं महाराणीसरकारांनीं त्यांस बोलावून आणून पुनः मुख्य दिवाणगिरीचें काम दिलें. तें सध्या ते करीत आहेत; आणि तें सर्वांस पसंत वाटत आहे.

राज्यव्यवहारज्ञान, आपल्या कामाची आस्था, व-क्तृत्व, धैर्य, आणि मनास जें योग्य वाटतें तें करण्याक्वि-षयीं खरा निर्धार, ह्या गुणांत त्यांची बरोबरी करण्यास समर्थ, त्यांच्या सारखा दुसरा पुरुष इंग्लिशांच्या एवढ्या मोठ्या राज्यांत मिळणें कठिण! हे मोठे ग्रंथकारही आ-हेत. ह्यांनीं आजपर्यंत लहान मोठीं २९१ पुस्तकें लिहिलीं आहेत, असें सांगतात. आणखी ते मोठे धार्मिक आहेत.

असे थोर पुरुष राष्ट्रामध्यें उत्पन्न होणें हें मोठें भा-ग्य होय. असें भाग्य आमच्या ह्या राष्ट्रास प्राप्त होवो.

## उद्योग हें सुखाचें साधन

### श्लोक.

मोठे कष्ट पिपीलिकेस[1] पडती दाणा घरीं न्यावया
कोळ्याला निज गेह[2] तंतुमय तें तैसेंच बांधावया
नेहेमीं मधुमक्षिका श्रमतसे गोळा कराया मधा
हीं सारीं जपती शिवो न सहसा जीवास कीं आपदा[3]. १.
मोठा सिंह पराक्रमी सकलही प्राणी तयातें भिती
त्याच्या ऐकुनियां रवा थरथरां जीवाभयें कांपती
भक्ष्यार्थें फिरणें तयासहि वनीं कीं प्रत्यहीं लागतें
केल्यावांचुनि कष्ट सौख्य न घडे तात्पर्य हें भासतें. २.
हें आणोनि मनीं करा निशिदिनीं उद्योग हो चांगला
विश्वेशावरती धरा भरंवसा आधार चित्ता भला
ज्या धीरीं दृढ निश्चया धरुनियां उद्योग केले महा
त्यांतें त्यांत दिलें यश प्रभुवरें हें दिव्य दृष्टी पहा. ३.
होता अल्प मनुष्य वित्त नव्हतें भोळा शिवाजी जरी
म्लेंछांनीं छळिलें रचोनि कपटें त्यातें अनेकांपरी
झाला तो यशवंत भूपति तयां वारोनियां हो तरी
उद्योगीं दृढ निश्चयास धरितां ही गोष्ट झाली खरी. ४.

होते अजाण धनहीन अरण्यवासी
कीं नोहतें विपुल अन्नहि खावयासी
पश्वंबरें[4] निजतनूवर घेत होते
झाले धनी प्रबल भूप पहा अहो ते. ५.
असो आणखी सांगणें तें कशाला
नको ती हिमाद्री[5] दिसाया मशाला

---

१ मुंगीला. २ घर. ३ दुःख. ४ पशूंचीं कातडीं. ५ हिमालय पर्वत.

दृढें निश्चयें उद्यमा चालवा हो
सुखाब्धी महाराष्ट्रदेशांत वाहो. ६.

---

## आवड आणि निवड.

आवड ही सर्व प्राण्यांच्या ठायीं स्वाभाविक असते. मांजरास दूध आवडतें, आणि लहान मुलांस खेळणें किंवा गोड खाणें आवडतें. त्यास कांहीं विचार लागत नाहीं. परंतु, निवड जी आहे, ती करायास, बरें कोणतें आणि वाईट कोणतें हें समजावें लागून, चांगलें तेवढें घ्यावें आणि वाईट तेवढें टाकावें, हें करण्याचें सामर्थ्य पाहिजे. हें सामर्थ्य ह्मटलें ह्मणजे केवळ विचाराचें आणि निश्चयाचें फल होय.

जीं माणसें आवडीच्या स्वाधीन झालेलीं असतात, त्यांचें वर्तन अगदीं अविचाराचें, ह्मणजे पशूंच्या वर्तनासारखें असतें. त्यांत पुढचा विचार मुळींच नसतो. लहान किंवा अविचारी मुलें, एकादा पदार्थ आवडला ह्मणजे, खा खा खातात, किंवा, नादीं लागलीं ह्मणजे, खेळ खेळ खेळतात; त्यापासून आपली प्रकृति बिघडेल, किंवा आपला विद्याभ्यासाचा वेळ व्यर्थ जाऊन आपली मोठी हानि होईल, हें त्यांच्या मनांत देखील येत नाहीं. त्याप्रमाणेंच कितीं एक मोठीं प्रौढ मनुष्यें व्यसनासक्त होतात; आणि, त्यापासून आपली मोठी हानि होत आहे, असें समजत असतांही, डोळ्यांवर कातडें ओढून, त्यांत तशींच राहतात. हें फार वाईट आहे. अशीं माणसें मनुष्यदेही पशु होत.

आपलें खरें हित साधायास, मनुष्यानें, आपल्या आ-

वडीस एकीकडे ठेवून, आपल्या बुद्धीप्रमाणें, चांगलें काय ह्याची निवड करून, त्याप्रमाणें वर्तावें, हें आवश्यक आहे. आजपर्यंत ज्या मनुष्यांनीं आपल्या उद्योगांनीं आपलें कल्याण करून घेतलें, ते आपल्या आवडीच्या स्वाधीन नव्हते, तर आपल्या निवडीच्या स्वाधीन होते. किंवा, आपली निवड हीच त्यांनीं आपली आवड करून टाकिली होती, असें ह्मटलें तरी चालेल.

परमेश्वराच्या शोधार्थ ध्रुव अरण्यांत चालला, तेव्हां त्याच्या आईनें त्यास आवडण्यासारखे पुष्कळ चांगले पदार्थ देऊं केले. परंतु, त्यानें, ईश्वराचा शोध लावणें ह्याची निवड केली होती; ती त्यानें दृढ धरिली; आणि तींत यश पावून तो चिरंजीव झाला. तसेंच, रामाबरोबर भरत वनवासास निघाला तेव्हां, राज्यसुखाचा लोभ सोडून त्यानें इतर लोकांस ह्मटलें आहे:—

"येणार ते या अथवा नकाही
राहेन मी हें न घडेचि कांहीं"

वामन.

ह्यावरून बोध घ्यावा. साधारणपणें आवड ही इंद्रियांची साह्यकर्ती आणि दुःखाची जननी असते; तिचा अंमल आपल्या मनावर चालूं देऊं नये. तर निवड ही विचाराची कन्या आणि सुखाची माता असते; तिचें अवलंबन करून, तिच्या धोरणानें चालावें ह्मणजे हित होईल.

---

## मातृभक्तांचें कल्याण होतें.

अमेरिकेंतल्या संस्थानांस स्वतंत्र करणारा प्रख्यात जार्ज वाशिंग्टन हा तरुण असतां, एका गलबतावर

कांहीं काम पतकरून तिकडे जावयास निघाला. सगळी तयारी झाली; त्याच्या सामानाची पेटी देखील त्या गलबतावर गेली. नंतर तो आपल्या आईचा निरोप घ्यावयास गेला. तेव्हां, तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहतांना त्यानें पाहिल्या. तेणेंकरून त्याला अतिशयित वाईट वाटलें; आणि त्यानें लागलेंच आपल्या नौकराकडे वळून त्याला सांगितलें, "जा, ती माझी पेटी परत आणायास सांग; माझ्या जाण्यानें आईला फार दुःख होत आहे; ह्मणून मी मुळीं जाणारच नाहीं."

तो त्या मुलाचा दृढ निश्चय पाहून त्याची आई सद्गदित होऊन त्याला ह्मणाली, "बाळा, जीं मुलें आईबापांचा मान राखितात, त्यांचें मी कल्याण करीन, असें देवानें अभिवचन दिलेलें आहे; त्याप्रमाणें तो तुझें कल्याण करील." त्याप्रमाणें खरोखरच त्याचें पुढें कल्याण झालें.

---

## "जूग कधीं मरत असतें काय?"

कोणता व्यवहार कोठें चालावयाचा, हें न समजणें हें वेडगळपण आहे. तें एकाद्या माणसाच्या हातून झालें ह्मणजे, त्याची हानि होते, आणि इतरांस हंसायास कारण सांपडतें.

एका लष्करामध्यें एक भोळसर शिपाई होता. त्याला सोंगट्या खेळायाचा फार नाद असे. त्यावरून त्याच्या मनांत असें पक्कें ठसून गेलें होतें कीं, कांहीं झालें तरी जूग मरत नाहीं. पुढें एके वेळीं त्यास लढाईस जाणें भाग पडलें. तेथें युद्ध भरास आल्यावर, शत्रूकडच्या

बाणांनीं आणि गोळ्यांनीं शेंकडों शिपाई आणि स्वार पाहतां पाहतां मरून पडूं लागले. तें दृष्टीस पडतांच, सोंगट्यांच्या डावांतला पेंच ह्या शेंदाडशिपायास आठवला, आणि, तो, हातांतली बंदूक खालीं टाकून, चटकर उडी मारून, एका घोड्यावर स्वाराच्या मागें त्याला गच्च धरून बसला. त्याला स्वारानें विचारलें, "अरे हें काय करतोस?" त्यास त्यानें मोठ्या घाईनें उत्तर दिलें, "अहो, चूप, बोलूं नका; आतां तुह्मांला आणि मला भय नाहीं." त्यास स्वारानें आणखी विचारिलें, "कां रे? आतां रे कां भय नाहीं?" शिपाई ह्मणाला, "आतां आपलें जूग झालें आहे. जूग कधीं मरत असतें काय?" हें तो बोलत होता, इतक्यांत सूं सूं करीत एक गोळी येऊन, ती त्या दोघांच्या उरांतून पार निघून गेली, आणि ते मरण पावले !

जेथलें तेथें शोभतें. घोड्याची चाल बुद्धिबळांत जशी असते, तशी जर जीवंत घोड्याची ठेवूं ह्मटलें, तर तें कसें साधेल, आणि तिचा काय उपयोग होईल?

ज्ञान प्राप्त करून घेणें हें वेगळें, आणि त्याचा यथायोग्य उपयोग करणें हें कांहीं वेगळें आहे. योजना पाहिजे; नाहींतर सगळें व्यर्थ.

---

## गणितप्रश्न.

पांच पैशांस एक भोपळा मिळतो, एका पैशाला एक कारलें मिळतें, आणि एका पैशाला वीस वांगीं मिळतात. आतां, शंभर पैशांत शंभर फळें आणायाचीं आहेत; तीं किती किती येतील.?

# बालबोध.



## महाराज जयाजीराव शिंदे.



सांप्रत काळीं ह्या देशामध्यें जे आमचे राजे थोडेसे राहिले आहेत, त्यांत शिंद्यांचें राज्य मोठें आहे. त्यांच्या प्रांताचें क्षेत्रफळ ३३,११९ चौरसमैल आहे; त्यांत लोकसंख्या २५,००,००० आहे; आणि त्याचें उत्पन्न १,११,०९,१०० रुपयांहून अधिक आहे. त्यांच्या राज्यामध्यें वीस हजारांपेक्षां अधिक सैन्य आहे. त्याची तयारी उत्कृष्ट आहे. ह्या राज्याचे अधिपति महाराज जयाजीराव आहेत. त्यांचा संक्षिप्त वृत्तांत आह्मी येथें देतों.

जनकोजीमहाराज हे इ० स० १८४३ त मरण पावले. तेव्हां त्यांस मूलबाळ कांहीं नव्हतें. ह्मणून, त्यांच्या

कुळांतील हणमंतराव नामक गृहस्थांचे चिरंजीव भगीरथराव ह्यांस त्यांचे दत्तक पुत्र करून, इंग्लिश सरकाराच्या मान्यतेनें गादीवर बसविलें; आणि त्यांस सयाजीराव महाराज असें नांव ठेविलें. त्या वेळीं ते आठ वर्षांचे होते. ह्मणून त्यांच्या राज्याचा कारभार त्यांचे सासरे मामासाहेब हे पहात असत.

पुढें दादा खासगीवाले ह्या नांवाच्या गृहस्थांनीं, महाराजांच्या मातुश्री ताराबाईसाहेब ह्यांस भलभलत्याच मसलती सांगून, मामासाहेबांस एकीकडे ठेवून, दरबारांत श्रेष्ठत्व मिळविलें; आणि त्यावरून मोठा बखेडा होऊन, शिंदेसरकार आणि इंग्लिशसरकार ह्यांचें वैमनस्य आलें. तें इतकें कीं, उभय पक्षांचीं सैन्यें सिद्ध होऊन, इ० स० १८४३त, एकेच दिवशीं, सकाळीं महाराजपुर येथें एक, आणि सायंकाळीं पुनियार येथें एक, अशा त्यांच्या लढाया झाल्या. त्यांत शिंदे सरकारच्या सैन्याचा अगदीं पराभव झाला. नंतर, शिंद्यांच्या दरबारी मंडळीनें इंग्लिशांशीं वैर करण्याचें सोडिलें; आणि त्यांच्या अनुमतानें, चांगल्या शहाण्या व अनुभव घेतलेल्या अशा सहा गृहस्थांचें एक प्रधानमंडळ नेमून, असें ठरविलें कीं, जयाजीराव शिंदे प्रौढ होत तोंपर्यंत त्यांनीं त्यांच्या राज्याचा कारभार चालवावा. ती व्यवस्था यथास्थित चालली. पुढें इ० स० १८५३त, महाराजांस स्वराज्य चालविण्याचा पूर्ण अधिकार मिळाला. त्यांच्या पूर्वींच श्री० रावराजे दिनकरराव ह्यांस त्यांच्या दरबारची दिवाणगिरी प्राप्त झाली होती.

पुढें चार वर्षांनीं शिपाई लोकांचें प्रचंड बंड उठलें. त्यांतले

पुढारी नानासाहेब पेशवे, तात्या टोपे इत्यादि मंडळी सैन्या-सहवर्तमान ग्वालेरीवर आली. त्यांशीं शिंदेसरकारानें कांहीं वेळ चांगली लढाई केली. परंतु, तींत यश आलें नाहीं; ह्मणून, महाराज आणि राजे दिनकरराव हे उभयतां इंग्लिश सरकारच्या आश्रयास आग्रा येथें निघून गेले. तेव्हां, इंग्लिश सरकाराकडचे प्रख्यात पराक्रमी सेनापति सर ह्यू रोजसाहेब ह्यांनीं एकदम ग्वालेरीवर हल्ला करून, तेथून बंडवाल्यांस हुसकून लाविलें, आणि जयाजीराव महाराजांस पुनः त्यांच्या गादीवर बसविलें. हीं वर्तमानें इ० स० १८५८च्या जून महिन्यांत घडलीं.

ह्या बंडाच्या प्रसंगीं महाराज जयाजीराव शिंदे आणि त्यांचे दिवाण राजे दिनकरराव हे इंग्लिश सरकाराशीं फार इमानें इतबारें वागले. ह्यावरून महाराजांस महाराणी सरकाराकडून तीन लाखांचा मुलूख व मोठा मान मिळाला, आणि राजे दिनकरराव ह्यांस इंग्लिश सरकारानें पांच हजारांची व शिंदे सरकारानें पन्नास हजारांची जहागीर दिली.

आपल्या राज्याच्या रक्षणाकरितां पायदळ पलटणी सात, स्वारांच्या पलटणी दोन, आणि गोलंदाजांच्या तुकड्या चार, इतकें इंग्लिशांचें सैन्य शिंद्यांस आपल्या राज्यांत ठेवावें लागतें. ह्यांत एकंदर सुमारें ८,४०० लोक आहेत.

महाराज न्यायी, नीतिमान्, आणि आपल्या प्रजेच्या हिताविषयीं परम दक्ष आहेत; आणि त्यांची प्रजा त्यांवर संतुष्ट आहे. परमेश्वरकृपेनें हें राज्य वृद्धि पावून चिरकाल असो.

---

## मरण खचीत येईल.

### श्लोक.

जरी जोडिलें हेम कोट्यानकोटी
जनामाजि संपादिली कीर्ति मोठी
सहस्त्रावधी ठेविले दासदासी
मरावें तरी लागतें कीं तयासी. १.
प्रयत्नें महा ग्रंथ वाचोनि सारे
मनीं ठेविलीं शुद्ध तत्त्वें अपारें
जगीं फार वाखाणिला ज्ञानराशी
मरावें तरी लागतें कीं तयासी. २.
रणीं मारिले शत्रु झुंजार भारी
धरा आणिली आपुलीया अहारीं
महा नित्य धन्वंतरी आश्रयासी
मरावें तरी लागतें कीं तयासी. ३.
भवा त्यागुनी जाहला थोर योगी
समाधीचिया तो सुखा नित्य भोगी
तया भेटतो बोलतो स्वर्गवासी
मरावें तरी लागतें कीं तयासी. ४.
अहो रावणासारिखे गर्वमूर्ती
तसे धर्मसे नम्रता ज्यांत पूर्ती
दरिद्री धनी पातकी पुण्यराशी
मरावें अशां लागलें कीं जनांसी. ५.
मलाही तसें खास लागेल जावें
असें नित्य अभ्यंतरीं आठवावें
न देवापुढें होय खालीं पहावें
प्रकारें अशा आयु हें घालवावें. ६.

## किता.

लहान मुलें लिहूं लागलीं ह्मणजे त्यांस पाहून काढण्याकरितां जो चांगल्या वळणदार अक्षराचा कागद त्यांच्यापुढें ठेवितात, त्यास किता ह्मणतात. आणि तो किता जितका चांगला मिळववेल, तितका चांगला मिळविण्याविषयीं लोक खटपट करितात. कां कीं, तो ज्या मानानें चांगला असेल, त्या मानानें मुलांचें अक्षर चांगलें व्हावयाचें, हें त्यांस ठाऊक असतें. आणि तें बहुतांशीं खरें आहे.

थोडा विचार करून पाहिला ह्मणजे असें लक्षांत येईल कीं, अक्षर चांगलें काढतां येण्यास जसा चांगला किता अवश्यक आहे, तशी कोणतीही एकादी चांगली गोष्ट करण्यास चांगला नमुना अवश्यक आहे. निरंतर नीतीनें वागणें, आपलें आयुष्य चांगल्या कामांत खरचिणें, करवेल तितकें जनाचें बरें करणें, दया, क्षमा, शांति ह्यांचें अवलंबन करणें, सदा संतोषवृत्ति असणें, परमेश्वरास भिऊन चालणें, इत्यादि अनेक गोष्टी मनुष्याच्या सुखास आणि कल्याणास अत्यंत अवश्यक आहेत; त्या बाजारांत विकत मिळत नाहींत; किंवा त्या कोणास कोणाच्यानें एकदम देववत नाहींत; तर, जसें कित्त्याकडे पाहून अक्षर आढतां काढतां चांगलें होतें, तसे, हे सद्गुण, गुणी पुरुषांकडे दृष्टि ठेवून, त्यांचा सदोदित थोडथोडा परिपाठ ठेविल्यानें मनुष्यास प्राप्त होतात. असे जे कोणी गुणी पुरुष आजपर्यंत होऊन गेले, तेच जनाचे उत्तम कित्ते होत. त्यांचे देह जरी नष्ट झाले आहेत, तरी आपल्या चरित्रांच्या रूपानें ते जीवंत

आहेत; आणि जनास नीतीचें वळण लावण्याचें काम जीवंत असतांना जें ते करीत होते, त्याच्या सहस्रपट अधिक काम ते आतां करीत आहेत.

गौतमबुद्ध हा जीवंत होता तेव्हां केवळ आपल्या भोंवतालच्यांस किंवा फारतर आपल्या राष्ट्रांतल्या लोकांस मात्र सन्मार्ग दाखवीत होता. परंतु, त्याचें चरित्र आणि त्याचीं मतें ह्यांच्या अवलोकनानें, आज कितीएक राष्ट्रांतल्या लक्षावधि लोकांस त्याचा कित्ता उपयोगी पडत आहे.

**धर्मराज** हा शांतीविषयीं आणि आपल्या वचनानुरूप सत्याचरण करण्याविषयीं उत्तम कित्ता होय. द्रौपदीची विटंबना पाहून भीमास अत्यंत कोप आला, आणि तो गदा घेऊन दुर्योधनाचे आंगावर धांवून चाललला; तेव्हां त्याला धर्म ह्मणाला:—

**ओंवी.**

**जरी क्रोध नावरे तुझिया चित्ता,**
**तरी गदा वोपीं माझिया माथां,**
**परी असत्यदोष कुंतीसुता,**
**स्पर्शो ऐसें न करावें.**

मुक्तेश्वर.

**रामदासस्वामी.**— हा निर्लोभतेविषयीं उत्तम कित्ता आहे. शिवाजी महाराज राज्य देण्यास सिद्ध झाले, तें त्यांनीं नको ह्मटलें.

**रामशास्त्री.**—हा निस्पृहतेविषयीं उत्तम कित्ता होय. ह्यांनीं नारायणरावाच्या वधाच्या संबंधानें राघोबादादांस जें उत्तर दिलें, आणि त्यानंतर जें आचरण केलेलें, तें सर्वत्र प्रसिद्ध आहे.

अशा थोरांचीं जीं चरित्रें, तेच आतां कित्ते होत. ते नित्य पुढें ठेवून, ह्मणजे मनांत आणून, त्यांचें काहीं तरी वळण धरण्याचा प्रयत्न करावा. तें पुष्कळ न लागलें, तर थोडें तरी लागेल; पण लागेल; तेवढाच लाभ.

---

## गर्वाचा अमल.

अमल येणें ह्मणजें वेडें होणें; आणि वेडें होणें ह्मणजे वस्तूचें सत्य स्वरूप असावें एक, आणि भासावें भलतेंच. ती स्थिति पशूच्या स्थितीपेक्षांही लज्जास्पद आहे.

एक मनुष्य मद्यपानाच्या अमलानें अतिशयित बेफाम होऊन, रस्त्यांतून "पैस पैस" असें मोठ्यांनीं ओरडत, आणि भेलकांड्या खात चालला होता. त्यास पाहून लोक त्यापासून दूर दूर होऊन जात होते. त्या रस्त्याच्या बाजूस एक मोठा वडाचा वृक्ष होता. त्याच्याजवळ ही स्वारी झुकांड्या खात खात गेली, आणि त्याला "पैस पैस" ह्मणूं लागली. परंतु, तो जाग्यावरून हालत नाहीं असें जेव्हां त्याच्या दृष्टीस पडलें, तेव्हां तो त्याला फार संतापून ह्मणाला, "नाय नाय! तुला धक्या मारिल्याशिवाय तूं वाट सोडायाचा नाय." असें ह्मणून त्यानें त्याला जी एक मोठी धक्की दिली, तीसरसा तो स्वतः त्या झाडापासून दहा पांच हातांवर जाऊन पडला. आणि मग त्या झाडाकडे पाहून ह्मणाला, "आतां ठीक झालें का नाय! आतां कसा दूर पळालास! खोड तुटली!" ह्यावरून, खरी गोष्ट झाली काय, आणि त्याला भासली काय, तें पहा!

गर्वाच्या अमलानें असेंच होतें. ह्मणजे, गर्वाच्या योगानें मनुष्य आपली स्वतःची योग्यता विसरतो, आणि ती फार मोठी आहे असें समजून भलभलतींच कर्में करायास प्रवृत्त होतो. तें वेड्यासारखें दिसतें, आणि त्याच्या योगानें शहाण्या मनुष्यास हंसायास येतें. इराण देशाचा राजा झर्कसिज हा मोठ्या सैन्यासहवर्तमान इ० स० पूर्वी ४८० वे वर्षीं युरोपखंडावर स्वारी करायास निघाला. त्याला हेलेस्पांट सामुद्रधुनी ओलांडून जावयाचें होतें, ह्मणून त्यानें तीवर नावांचा पूल बांधविला. तो पुरता झाला न झाला इतक्यांत समुद्रांत एकाएकीं मोठें तुफान होऊन त्याच्या योगानें तो सगळा मोडून गेला. तें पाहून झर्कसिज ह्यास अतिशयित संताप आला, आणि त्यानें मोठ्या रागानें ओरडून असा हुकूम केला कीं, "त्या समुद्रास एकदम तीनशें फटके मारा, आणि त्यामध्यें लोखंडाच्या मोठमोठ्या बिड्या टाकून द्या, एरवीं तो ताळ्यावर यावयाचा नाहीं. आणखी त्याला असें स्पष्ट कळवा कीं, स्वेच्छाचारी दांडग्या समुद्रा, तुझ्या धन्यानें ही शिक्षा तुला केली आहे; आणि, तुला आवडो अगर न आवडो, तुला ओलांडून पार जाण्याचा निश्चय त्यानें केला आहे, हें खचीत समज !" त्याप्रमाणें ती आज्ञा त्याच्या सेवकांनीं परिपूर्ण केली !

आपणास कोणत्याही मनोविकाराचा अमल इतका येऊं नये, ह्याविषयीं मनुष्यानें जपावें. बेसावध राहूं नये.

---

## मागच्या अंकांतल्या प्रश्नाचें उत्तर.

१९ भोंपळे; १ कारलें; आणि ८० वांगीं.

---

# बालबोध.



## लार्ड रिपन.



परमेश्वराच्या इच्छेनुरूप हें आपलें राष्ट्र इंग्लिश लोकांच्या अमलाखालीं गेलें आहे. ह्याचा राज्यकारभार चालविण्यास इंग्लंडाहून, पांच पांच वर्षांच्या मुदतीनें, एक मोठा अधिकारी नेमून येत असतो. त्यास गव्हरनर जनरल आणि व्हाइसराय हा किताब आहे. ह्यास वीस बावीस हजार रुपये दरमहां पगार असून, ह्याचा हुकूम सगळ्या हिंदुस्थानावर चालतो. असे जे गव्हरनर जनरल आजपर्यंत ह्या आपल्या देशावर आले, त्यांत सध्याचे गव्हरनर जनरल फार उत्तम, किंबहुना अप्रतिम होत. ह्यांचें नांव लार्ड रिपन हें आहे.

हे लार्ड रिपन इ० स० १८२७ ह्या वर्षीं जन्मले. त्यांनीं लहानपणीं फार चांगला अभ्यास करून मोठा लौकिक मिळविला. ते इ० स० १८५३ ह्या वर्षीं पार्लमेंट सभेचे सभासद झाले. आणि मग त्यांनीं कितीएक मोठमोठीं सरकारी कामें पतकरून तीं चांगल्या प्रकारें बजाविलीं. तेणेंकरून विलायतच्या दरबारांत त्यांचें वजन पुष्कळ वाढलें. आणि, लार्ड लिटन हे आपलें गव्हरनर जनरलाचें काम सोडून गेल्यावर, महाराणी सरकारांनीं ह्यांस त्या जागेवर नेमिलें. त्याप्रमाणें ते, इ० स० १८८० च्या जून महिन्यांत कलकत्त्यास दाखल होऊन आपलें काम पाहूं लागले.

आह्मीं ह्या गृहस्थांस अप्रतिम ह्मटलें आहे, ह्याचें कारण असें आहे कीं, ह्या देशांत जे इंग्लिश लोक येतात, ते बहुतकरून आपलें व आपल्या लोकांचें मात्र हित पाहतात, आणि ह्या देशांतल्या लोकांस हलके आणि तुच्छ समजून, त्यांच्या हिताकडे मुळींच लक्ष देत नाहींत, असें आढळतें; परंतु लार्ड रिपन ह्यांची वर्तणूक ह्याच्या अगदीं उलट आहे; ह्मणजे ते, आपल्या लोकांस आणि हिंदुस्थानच्या लोकांस एकसारखे समजून, जे कितीएक हक्क इंग्लिश लोकांपेक्षां हिंदुस्थानच्या लोकांस कमी आहेत, ते सर्व त्यांस देऊन, सर्वांस एकसारखें करण्याचा प्रयत्न ते करीत आहेत. हें कितीएक इंग्लिश लोकांस बरें वाटत नाहीं. ह्मणून ते लार्ड रिपन ह्यांची फार निंदा करितात. तरी ती सगळी एकाद्या साधूप्रमाणें शांतपणें सोसून, ते आपलें स्तुत्य काम एकसारखें पुढें

चालवीत आहेत. खरोखर ते धन्य होत. तुकाराम महाराजांनीं जें ह्मटलें आहे कीं,

"जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती
देह कष्टवीती उपकारें,"

त्याची आठण आह्मांस होते; आणि आह्मी लार्ड रिपन ह्यांची गणना संतांत करितों.

ह्या देशांतलें कलाकौशल्य बुडत चाललें आहे, त्यास उत्तेजन देऊन तें उदयास आणावें, आणि तद्द्वारा ह्या देशांतल्या लोकांचें कल्याण करावें, असेही त्यांचे पुष्कळ प्रयत्न चालले आहेत.

त्याप्रमाणेंच ह्या देशाच्या राज्यकारभाराचें काम होईल तितकें ह्या देशांतल्या कोकांच्या हातीं सोंपावें, असा उद्योग ते करीत आहेत.

ह्या माहात्म्यांची पांच वर्षांची मुदत दहा वर्षंपर्यंत तरी वाढवावी, ह्मणून हिंदुस्थानच्या लोकांनीं महाराणी सरकारास अर्ज केला आहे. तो मान्य करण्याची बुद्धि परमेश्वर त्यांस देवो.

लार्ड रिपन हे मोठे धर्मनिष्ठ आहेत. आणि अशा उत्तम रीतीनें वागण्याविषयीं जी त्यांची प्रवृत्ति होते, ती, त्या धर्मनिष्ठेचें फल असावें, असें वाटतें. देव करो आणि ते ह्या देशावर पुष्कळ दिवस राहोत.

---

## पाणिपतावर जाण्याची तयारी.

### आर्या.

रणवीरहो चला त्या यवनपतीशीं करावया समर
व्हावें यशवंत तुह्मीं दैत्यांशीं झगडतां जसे अमर[1]. १.

---

1 देव.

मोठ्या यत्नीं केलें संपादन जें स्वकीय वडिलांहीं
तें राज्य आपणांला रक्षाया आजि काय बल नाहीं. २.
निजपतिसंपादित बहु अबलाही[1] रक्षितात धनराशी
तें कार्य नये तर मग धिक्कार असो अशा नरपणाशी. ३.
जिकडे नय[2] तिकडे हरि हें आहे नीतिवच जरी ठावें
त्या पाप्यावर मग कां शस्त्र धराया न आपण उठावें. ४.
कंबर बांधा लवकर चला करा घोर समर हो यवनीं
कोल्ह्यांनीं सिंहांच्या काय करावें पराक्रमास वनीं. ५.
निजराज्यरक्षणासम दुसरें शुभकार्य या जगीं नाहीं.
हें जाणोनि खरचिले त्याकरितां असु रणीं बहु जनांहीं. ६.
शस्त्र धरूं यत्न करूं समरीं मारूं पराक्रमें अरिला[3]
किंवा मरूं ह्मणा हा निश्चय देवा स्मरोनियां धरिला. ७.
धारातीर्थीं[4] पडलों तर जाऊं मुक्तिसौख्य भोगाया
अरि जिंकिला तर यशें आहेत विसिद्ध[5] हे सुकवि गाया. ८.
कोण्याही अर्थानें जन्मसफलता रणीं खरी होती
साधायाची संधी नका पहा घालवूं चतुर हो ती. ९.
हा बुद्धिवाद तुमच्या मना करो प्रेरणा चलायाची
उत्पत्तिस्थितिलय जो करितो त्या दास हें नमुनि याचीं[6]. १०.

---

## दुखणें.

दुखणें ह्मणजे पीडा. तें कोणास आवडत नाहीं; आणि तें टाळण्याविषयीं होतील तितके प्रयत्न करितात. परंतु, तें आल्यावांचून राहत नाहीं. आहार, निद्रा इत्यादिकांत नियमितपणा ठेविल्यानें प्रकृति चांगली राहते,

---

१ स्त्रिया. २ न्याय. ३ शत्रूला. ४ समरांगणीं. ५ तयार. ६ मागतो.

दुखणें येत नाहीं, असें पुष्कळ लोक समजतात; आणि पुष्कळ अंशीं खरें आहे, असें अनुभवावरून वाटतें. परंतु अतिशयित नियमित रीतीनें राहणाऱ्या मनुष्यांसही दुखणें सोडीत नाहीं. तें यावयाचें तें येतेंच. ह्यावरून, प्रकृति निरोगी राखणें हें केवळ मनुष्याच्या हातचें नाहीं; तर, त्याच्या हातीं नाहीं असें कांहीं त्यांत आहे, असें दिसतें. असें नसतें, तर, नियमित रीतीनें राहणाऱ्या माणसाला दुखणें कधींच आलें नसतें.

आपल्या देहामध्यें कफ, वात, पित्त, इत्यादि तत्त्वें कांहीं नियमित प्रमाणानें असतात, तोंपर्यंत आपली प्रकृति चांगली असते; आणि शरीराचे सगळे व्यापार बरोबर चालतात. परंतु, एखाद्या कारणावरून तें प्रमाण बिघडून त्यांतलें एकादें तत्त्व वाजवीपेक्षां वाढविलें, किंवा कमी झालें, ह्मणजे सगळी घडी बिघडते, आणि शरीरव्यापार बरोबर चालेनातसे होतात. त्यालाच आपण दुखणें ह्मणतों. तें दुखणें नाहींसें करावयाचें ह्मटलें ह्मणजे, जें तत्त्व अधिक झालें असेल तें कमी करणें किंवा कमी झालें असेल ते अधिक करणें होय. आणि वैद्य जीं औषधें देतात, त्या सर्वांचा मुख्य उद्देश हाच असतो. हा सिद्धीस जाण्यास आधीं प्रथम, कोणतें तत्त्व कमी किंवा जास्ती झालें आहे, हें समजणें अवश्यक आहे; ह्यास चिकित्सा ह्मणतात; आणि मग, तें कोणत्या औषधाच्या योगानें व्यवस्थित होईल हें समजून, त्याप्रमाणें तें देणें, ह्यास योजना ह्मणतात. ही चिकित्सा बिनचूक होण्यास मनुष्याच्या शरीरप्रकृतीचें ज्ञान पूर्ण असलें पाहिजे; आणि योजना बिनचूक होण्यास पदार्थांच्या गु-

णधर्मांचें ज्ञान पूर्ण असलें पाहिजे. तें आहे कोठें ? सिंधूंत बिंदु देखील नाहीं. सगळें अजमासाअजमासानें चालले आहे, असें मोठमोठाले वैद्य ह्मणतात. तेव्हां, त्यांत चुक्या व्हाव्या ह्यांत नवल तें कोणतें ?

दुखण्याचा वाईट परिणाम मरण होय. ह्मणून मनुष्यें दुखणें दूर करण्याचा प्रयत्न मोठ्या अगत्यानें करितात. राजेरजवाड्यांची प्रकृति तर मोठमोठे वैद्य प्रत्यहीं पाहतात. परंतु, त्यांस दुखणें टाळितां येतें काय ? आधीं मुळीं दुखणें येत आहे, असें कळेल तर तें टाळतील कीं नाहीं ? एकादें दुखणें असें असतें कीं, तें आंगांत वाढत असतें, तरी मनुष्याच्या समजुतीस येत नाहीं. तें कोठपर्यंत; मरण येईपर्यंत !

स्पेनदेशाचा राजा पहिला महंमद हा चांगला धडाखडा दिसत असून, संध्याकाळीं स्वस्थपणें बागेंत हिंडत असतां, त्यास त्याच्या दरबारचा एक उमराव ह्मणाला, "जगांतलीं सगळीं सुखें परमेश्वरानें राजांकरितां उत्पन्न केलीं आहेत. त्यांचें जिणें किती सुखाचें ह्मणून सांगावें?" त्यावर तो राजा ह्मणाला, "अहो, राजे चालतात, त्या मार्गांवर गुलाबाचीं फुलें पसरलेलीं आहेत अशीं दिसतात खरीं; पण, गुलाबाला कांटे असतात, हें तुह्मांला ठाऊक नाहीं काय ? आणि शेवट ह्मटला ह्मणजे राजाचा आणि रंकाचा एकसारखाच नव्हे काय ? शेवटीं एकटा जायाचा ! आयुष्याची दोरी ईश्वराचे हातांत." हें बोलणें झाल्यावर तो राजा नित्याप्रमाणें आपल्या रंगमहालांत जाऊन छपरपलंगावर निजला. आणि तेव्हां जो निजला तो निजलाच; पुनः उठला नाहीं !

महंमदाच्या आंगांतलें दुखणें वाढत होतें, तें त्याला आणि त्याच्या वैद्याला समजलें नाहीं. दुखणें समजलेंच नाहीं, तेव्हां उपाय कोठून होणार !

ह्यावरून बोध घेऊन सावध व्हावें. प्रकृति चांगली सुदृढ वाटत आहे, एवढ्यावरून आपल्या अंगांत दुखणें नाहींच, असें समजूं नये. दुखण्याच्या वाईट परिणामास नेहमीं तयार असावें. ह्यास उत्तम साधन ह्मणजे सदाचरण होय.

---

## पाण्याचें झाड.

आफ्रिका खंडाच्या पूर्वेस माडागास्कर ह्या नांवाचें एक मोठें बेट आहे. त्यामध्यें एका प्रकारचीं झाडें आहेत. त्यांचे बुंधे मोठे असून, त्यांचीं पानें केळीच्या पानांसारखीं असतात. तीं तेथील लोकांस, केळीच्या पानांप्रमाणें जेवायास उपयोगीं पडून, घरांच्या शाकाराच्याही उपयोगीं पडतात. ह्या झाडांची उंची बुंध्यापासून पानें फुटतात तेथपर्यंत सुमारें बत्तीस पस्तीस फूट असते. ह्या झाडाच्या खोडामध्यें पुष्कळ निर्मळ पाणी असतें. तहान लागली ह्मणजे लोक त्याच्या जवळ जातात; त्याच्या खोडास भोंक पाडितात; आणि त्यांतून जें अमृतासारखें गोड पाणी येतें, तें पिऊन समाधान पावतात ! रात्रीं जें दंव ह्या झाडांच्या पानांवर जमतें, तें त्याच्या खोडांत वाहात जाऊन, त्याचें हें पाणी झालेलें असतें ! केवढा चमत्कार आहे ! अशींच कितीएक बेटांमध्यें भाकरीचीं झाडें आहेत. प्राण्यांच्या सोईकरितां परमेश्वरानें कोठें काय काय करून ठेविलें आहे, ह्याचा

अंत लागावयाचा नाहीं. मनुष्याला ह्याविषयीं जें कांहीं समजलें आहे, तें, समजलेलें नाहीं त्याच्या शतकोट्यांशा-इतकें तरी आहे काय ? नाहीं; खरोखर इतकें देखील नाहीं. तरी त्याला ज्ञानाचा गर्व केवढा आहे तो पहा !

## खरें प्रामाणिकपण.

दक्षिण अमेरिकेमध्यें पूर्वीं गुलामांच्या क्रयविक्र-याचे बाजार असत. त्यांतल्या एका बाजारामध्यें एक अगदीं नवा तरणा गुलाम विकरीस आणिला होता. तो स्वभावानें चांगला आणि थोर मनाचा असावा, असें त्याच्या मुद्रेवरूनच दिसत होतें. तो कोणा दुष्टाच्या हातीं पडूं नये, ह्मणून, कोणी एक दयाळू सुशील गृ-हस्थ त्यापाशीं जाऊन, उगाच त्याचें मन पाहण्याक-रितां, त्यास ह्मणाला, "कायरे मुला, जर मीं तुला घेतलें, तर तूं माझीं कामें इमानेंइतबारें करशील ना" ? त्यावर त्या मुलानें उत्तर दिलें, "महाराज, मला आ-पण घ्या किं दुसरा कोणी घेवो, मजवर सोंपलेलें काम मला इमानेंइतबारें केलेंच पाहिजे." हें उत्तर किती उत्तम आहे ! खरें प्रामाणिकपण हें बावनकशी सोन्या-सारखें आहे. तें तुह्मी कोठेंही ठेवा. तें जशाचें तसें रहावयाचें.

## गणितप्रश्न.

एका वाण्यापाशीं खोटी तराजू होती. तिच्या एका पारड्यांत गूळ घालून वजन केला, तो प्रथम १६ शेर भरला; आणि मग तो दुसऱ्या पारड्यांत घालून वजन करून पाहिला, तो अवघा ९ शेर भरला. ह्यावरून तो गूळ खरोखर किती शेर होता, व अशा कामांत पदार्थांचें खरें वजन कसें काढावें, तें सांगा.

# बालबोध.



## महाराज तुकोजी राव होळकर.



आमच्या देशाच्या इतिहासामध्यें तरवारबहादुरीविषयीं ज्या घराण्यांची फार आख्या आहे, त्यांतल्या प्रमुखांत होळकरांच्या घराण्याची गणना आहे. त्याच्या सैन्याच्या आणि इंग्लिशांच्या सैन्याच्या ज्या कितीएक झटापटी झाल्या, त्यांचें वर्णन ग्रंथांतरीं केलेलें आहे.

होळकरसरकारची राजधानी इंदूर आहे. तेथील पूर्वींचे महाराच हरिराव हे इ० स० १८४३ ह्या वर्षी मरण पावले; आणि हल्लींचे महाराज तुकोजीराव होळकर हे त्यांचे दत्तक पुत्र त्यांचे गादीवर बसले. तेव्हां हे अल्पवयस्क होते. पुढें प्रौढ झाल्यावर, ते आपल्या राज्याचा कारभार स्वतः पाहूं लागले. इ० स० १८५७ च्या बंडाच्या गर्दींत ह्यांच्याही मुलुखांत कांहीं गडबड झाली होती; व त्या बिथरलेल्या लोकांशीं इंग्लिश सरकाराच्या सैन्यास बराच झगडा करावा लागला. परंतु,

त्यांत होळकर सरकारचें अंग मुळींच नव्हतें, अशी इंग्लिश सरकारची खातरी होती.

ही बंडाची गडबड खेरीज करून, हे महाराज गादीवर बसल्यापासून आजपर्यंत, त्यांच्या राज्याचा कारभार अगदीं शांतपणें चालला आहे. त्यांच्या मुलुखाचें क्षेत्रफळ ८३१८ चौरस मैल आहे; लोकसंख्या ५७६००० आहे; आणि उत्पन्न ३०००००० रुपये आहे. ह्या राज्यांतले लोक सुखी आहेत. आणि होळकरसरकार आपला राज्यकारभार फार उत्तम रीतीनें चालवून इंग्लिश सरकाराशीं फार स्नेहभावानें वागतात. हेही महाराज आपल्या वंशाच्या आख्येप्रमाणें मोठे तेजस्वी आणि शूर आहेत, असें ह्मणतात. परंतु, ह्या शांततेच्या युगामध्यें त्या गुणांचें प्रदर्शन होण्याचा प्रसंगच येत नाहीं. दूधपाण्याशीं गांठ पडल्यावांचून हंसाची परीक्षा होत नाहीं; आणि याचकाशीं गांठ पडल्यावांचून दात्याची परीक्षा होत नाहीं; तशी, अशा पुरुषांची परीक्षा युद्धप्रसंगावांचून होत नाहीं. पण ती सहसा न होवो. तीवांचून कांहीं अडलें नाहीं. आमच्या देशांत शांतता आहे, हा आह्मांस फार मोठा लाभ आहे.

कारण पडल्यास मुलगा दत्तक घेण्याचा अधिकार ह्या महाराजांस, इ० स० १८६२ त, इंग्रज सरकारानें दिला आहे. परंतु, परमेश्वरकृपेनें त्या अधिकाराचा उपयोग करण्याचें प्रयोजन नाहीं. महाराजांस पुत्र झाले आहेत. हें आमचें स्वराज्य निरंतर उत्तम प्रकारें चालो, अशी परमेश्वरापाशीं आमची प्रार्थना आहे.

---

## पराधीनता.

### श्लोक.

असुनि दुःख मनीं हंसतों वरी
मुख वरी रडतों जरि अंतरीं
समज एक दुजें वदतों पहा
परवशत्व विचित्र कसें अहा. १.
धनगरापुढती कुतरा जसा
मन धरूं बहु वागडतो तसा
पुढपुढें करितों धरुनी स्पृहा[1]
परवशत्व विचित्र कसें अहा. २.
जरि मला कळतें बेरवें बुरें[2]
न वदवे तरि काय खरेंखुरें[3]
वृषभ[4] गाभण ही ह्मणतों दुहा[5]
परवशत्व विचित्र कसें अहा. ३.
खचित मी बहु डोळस आंधळा
असुनि पाय अरोगाहि पांगळा
कळुनि चार दुणे ह्मणतों दहा
परवशत्व विचित्र असें अहा. ४.
सकल हा क्रम पोट भरावया
न मनुजत्व[6] पशुत्वचि नांव या
हरहर प्रभु यो करुणा तुला
कर विमुक्त सुदीन जना मला. ५.
पराधीनता रौरव[7] स्पष्ट हो तो

---

१. इच्छा. २. चांगलें. ३. वाईट. ४. बैल. ५. दूध काढा.
६. मनुष्यपण. ७. नरक.

तयानें जनां ताप अत्यंत होतो
परी त्याविणें या न चाले जनांत
ह्मणोनी तया सुज्ञही वाहतात. ६.

---

## करून दाखवावें, बोलून फसूं नये.

आत्मस्तुति करण्याची संवय हा एक मोठा दोष आहे. तो आपले ठायीं असूं नये, असें सर्वांस वाटतें. परंतु, त्यापासून अगदीं अलिप्त अशीं मनुष्यें फार थोडीं असतात; आणखी त्यांतही, मोठ्या अधिकारावरचीं मनुष्यें अगदीं कमी, किंबहुना मुळींच नसतात, असें ह्मटलें तरी चालेल. असें होण्याचें करण असें कीं, त्यांस आत्मस्तुति करून घेण्याचे प्रसंग पुष्कळ असतात; आणि तींत जरी केवढें व्यंग असलें, तरी त्यांस त्याविषयीं कोणी कांहीं बोलत नाहीं. मागें केलेल्या कृत्यांबद्दल आपली वाहवा करणें ही आत्मस्तुति; तीप्रमाणेंच, पुढें करावयाच्या गोष्टींविषयीं आपल्या सामर्थ्याची आपणच तारीफ करणें, ही वल्गना होय. ही आत्मस्तुतीपेक्षांही वाईट आहे. कां कीं, पुढें घडणाऱ्या गोष्टी मनुष्याच्या हातच्या नसतात. त्यांत अनेक कारणांनीं विपर्यास घडतो. आणि त्यांत एकादा विपरीत प्रकार घडून आला, ह्मणजे, त्यापासून जी लज्जा प्राप्त होते, तीस कांहीं पारावार नसतो. तीपेक्षां मरण बरें. तरी ही चूक मोठमोठ्यांच्या हातून देखील घडते.

चौथाई व सरदेशमुखी ह्याबद्दलची बाकी निजामअल्लीकडे राहिली होती; तिची मागणी पेशव्यांनीं केल्यावरून, उभय पक्षांचें वैर वाढून दोहींकडे युद्धाची

तयारी झाली. निजामअल्लीचा दिवाण मशीरउलमुलुख हा मोठा गर्विष्ठ आणि वल्गना करणारा होता. तो, निजामाच्या भरदरबारांत मोठ्या डौलानें असें ह्मणाला कीं, "आतां पेशव्यांचें सर्वस्व घेऊन, त्यांस लंगोटी लावून त्यांचे हातीं एक भोंपळा देऊन, स्नानसंध्या करावयास त्यांस काशीस लावून देऊं." नंतर, इ० स० १७९५ च्या मार्च महिन्यांत, खरडें येथें, उभय पक्षांचें युद्ध झालें. त्यांत निजामअल्लीच्या सैन्याचा अगदीं मोड होऊन, मराठे जय पावले. तेव्हां निजामअल्लीनें तहाचें बोलणें लाविलें. त्या वेळीं, त्यास मराठ्यांनीं प्रथम सांगून पाठविलें कीं, "वल्गना करणारे तुमचे शहाणे दिवाण मशीरउलमुलुख ह्यांस आधीं तुह्मी आमचे स्वाधीन करा, आणि मग तहाविषयीं काय बोलायाचें असेल तें बोला." मशीरउलमुलुखास पेशव्यांच्या स्वाधीन करणें हें निजामअल्लीस पराकाष्ठेचें अपमानास्पद वाटलें. परंतु, निरुपायास्तव, तें करणें त्यास भाग पडलें. मशीरउलमुलुख पेशव्यांच्या दरबारीं आला, तेव्हां त्याला किती लाज वाटली असेल बरें! हीच वल्गना जर तो न करिता, तर त्याला तो अपमान सोसण्याचा प्रसंग आला नसता.

ही मोठी गोष्ट आहे. पण, अगदीं साधारण लहान गोष्टींतही वल्गनांवरून अपमान सोसायाचा प्रसंग येतो. ह्यास्तव, अशी वल्गना करण्याची वासना उत्पन्न झाल्याबरोबर विचार करावा, आणि ती सोडून द्यावी. बोलून दाखविण्यापेक्षां करून दाखविणें बरें. बोलून दाखविण्याची कांहीं आवश्यकता नसते; ह्मणून त्याप्र-

माणें न झालें ह्मणजे अपमान होतो; परंतु, करून दाखविण्याची आवश्यकता असते; ह्मणून, वेळानुसार तें जरी न साधलें, तरी सुज्ञ पुरुष त्यास नांव ठेवीत नाहींत; प्रयत्न केल्याबद्दल त्याची प्रशंसाच करितात. दासबोधामध्यें रामदासस्वामींनीं ह्मटलें आहेः—

ओंवी.

करणें असेल उपाय
तरी बोलोनि दाखवूं नये
परस्परेंचि प्रत्यय
प्रतीतीस आणावा.

त्याप्रमाणेंच, आत्मस्तुति किंवा वल्गना ह्यांचें मूळ बीज अहंकार होय. तो सुटला पाहिजे. त्याविषयीं मोरोपंतांनीं मंत्रभागवतांत ह्मटलें आहेः—

आर्या.

गलिताहंकृति जाणे
बंधा मोक्षासि अनुभवीं चढला
तो पंडित इतर नव्हे
जरि पुष्कळ शास्त्र सर्वही पढला.

ह्यास्तव, आत्मस्तुति किंवा वल्गना करूं नये. काय करायाचें तें करून दाखवावें. हाच खरा पुरुषार्थ.

---

## माणसापेक्षां कोंबडा बरा.

कितीएक माणसें अशीं असतात कीं, एकाद्या वस्तूचा उपयोग त्यांस माहीत नसला ह्मणजे, ती वस्तु निरुपयोगी असें समजून, तीं तिचा नाश करून टाकितात. तेणेंकरून कधीं कधीं फार नुकसान होतें. तीं मा-

णसें "कोंबडा आणि रत्न" ह्या गोष्टींतल्या कोंबड्यापेक्षांही नीच होत. कां कीं, त्या कोंबड्यानें त्या रत्नाचा नाश करण्याचा प्रयत्न केला नाहीं.

सोळाव्या शतकामध्यें फ्रान्स देशांत डीस्कार्टिस ह्या नांवाचा कोणी एक मोठा नामांकित तत्त्ववेत्ता होऊन गेला. त्याचें मत असें असे कीं, मनुष्य खेरीज करून जे इतर प्राणी आहेत, त्यांस आत्मा नाहीं, आणि ते, सृष्टपदार्थ चमत्कारिक रीतीनें संयोग पावून, एकाद्या यंत्राप्रमाणें उत्पन्न झालेले आहेत. हें त्याचें मत इतर पंडितांस मान्य नव्हतें. ह्मणून, आपल्या ह्मणण्याच्या प्रतिपादनार्थ, एक बाहुली, अगदीं हुबेहूब एकाद्या मुलीप्रमाणें त्यानें तयार केली. तिचे ठायीं अंतर्गत जीवव्यापार खेरीज करून, मनुष्याचे सगळे गुण त्यानें मोठ्या प्रयत्नानें साधिले होते. ती बाहुली एका पेटींत घालून, ती बरोबर घेऊन, कोठें जाण्याकरितां, तो एका गलबतांत बसला. तो कोठें इकडे तिकडे गेल्यावर, त्या पेटींत काय आहे हें पाहण्याकरितां गलबतांवरच्या नाखव्यानें ती सहज उघडिली; तेव्हां, तींत, ती मुलगी, अंगीं सगळें चलनवलन असून, जीवंत नाहीं, अशी त्याच्या दृष्टीस पडली; आणि त्याच्या मनांत आलें कीं, ही कांहींतरी भूतचेष्टा आहे. ह्मणून, त्यानें ती पेटीच्यापेटी उचलून समुद्रांत टाकून दिली ! त्यामुळें, डीस्कार्टिस ह्याचे कितीएक वर्षांचे श्रम फुकट गेले. हें त्या नाखव्याच्या मूर्खपणाचें फळ होय.

वस्तूचा उपयोग आपणास कळत नसला, ह्मणजे, तेवढ्यावरून ती अगदीं निरुपयोगी आहे, असें समजूं

नये; तर तिचा उपयोग आपणास ठाऊक नाहीं, हें आपलें अज्ञान आहे, असें समजावें. अगदीं निरुपयोगी अशी एकही वस्तु ह्या सृष्टीमध्यें नाहीं; आणि ज्या वस्तूंचा उपयोग ठाऊक नाहीं, त्या वस्तूंचा उपयोग माहीत करून घेणें हेंच काय तें ज्ञान होय. तें संपादण्याचा प्रयत्न मनुष्यानें करावा.

---

## खरोखरच ग्रहांचे उपकार.

फ्रान्स देशामध्यें इ० स० १७८९ ह्या वर्षीं मोठी भयंकर राज्यक्रांति झाली. तींत लक्षावधि लोक, तटांच्या पायीं मरण पावले. त्या प्रसंगीं लालांडे ह्मणून एक मोठा ज्योतिषी तेथें होता. तो, ग्रहांचे वेध घेण्याच्या नादांत इतका मग्न झाला होता कीं, लोकांतल्या कोणत्याही तटास मिळण्यास त्यास सवड झाली नाहीं. तेणेंकरून तो कोणाच्या डोळ्यांत खुपला नाहीं; तेव्हां सहजच त्याचा बचाव झाला. तो राज्यक्रांतीचा होम आटोपल्यावर, तो आपल्या एका मित्रास ह्मणाला, "एवढ्या मोठ्या अनर्थांतून बचावून मी सुरक्षित राहिलों आहें, ह्याबद्दल मी माझ्या ग्रहांचे उपकार मानितों. कां कीं, त्यांनीं जर माझें चित्त वेधिलें नसतें, तर मी कोणत्या तरी एका तटास मिळालों असतों, आणि विनाकारण प्राणांस मुकलों असतों." गोष्ट खरी आहे.

---

## मागच्या अंकांतल्या प्रश्नाचें उत्तर.

खरोखर वजन १२ शेर. दोहोंकडच्या वजनांचा गुणाकार करून त्या संख्येचें वर्गमूळ काढलें, म्हणजे तें खरें वजन होय.

---

# बालबोध.



## लार्ड विलियम बेंटिंक.



जगांतल्या इतर राष्ट्रांमध्यें लोक स्वराज्यांचा उपभोग उत्तम रीतीनें घेत आहेत, आणि तो आपल्या वांट्यास आला नाहीं, हें पाहून आह्मां हिंदुस्थानवासी जनांस वाईट वाटत असावें, हें अगदीं साहजिक आहे. परंतु, त्यांतल्या त्यांत, जे परकीय लोक आह्मांवर राज्य करीत आहेत, त्यांतले कितीएक पुरुष आमच्या राष्ट्राच्या बऱ्याकरितां मनापासून झटून, आपलें नांव मागें ठेवून गेले आहेत, हें मनांत आलें म्हणजे पुष्कळ बरें वाटतें; आणि अशा पुरुषांचें देव्हारें करण्यास उल्हास होतो. त्या पुरुषांपैकीं लार्ड विलियम बेंटिंक हा पुरुष होता.

हा गृहस्थ इ० स० १८२८ ह्या वर्षीं गव्हरनर जनरल होऊन ह्या देशांत आला; तो त्या कामावर इ० स० १८३५ पर्यंत होता. त्याच्या कारकिर्दींत युद्धें, तह

नवीन देश घेणें इत्यादि मोठमोठ्या गोष्टी फारशा घडल्या नाहींत. तरी, लोकहिताच्या दुसऱ्या पुष्कळ चांगल्या गोष्टींवरून ह्या गृहस्थाची कारकीर्द लक्षांत ठेवण्यासारखी झाली आहे. त्यांतल्या कांहीं गोष्टी आह्मी येथें सांगतों.

लष्कराचा खर्च कमी करण्याकरितां त्यानें शिपायांचा **दुप्पट भत्ता** बंद केला. दुप्पट भत्ता ह्मणजे, लढाईवर असतां, त्यांस नियमित पगारापेक्षां अधिक पैसा मिळत असे तो. राज्याचा खर्च कमी केला ह्मणजे रयतेच्या डोक्यावरचें करांचें ओझें कमी होतें; तें चांगलेंच.

**सती जाणें** ह्मणजे, नवऱ्याच्या प्रेताबरोबर बायकोनें आपणास मरेपर्यंत जाळून घेणें. ही चाल हिंदुस्थानांत पुष्कळ होती. इ०स०१८१७ ह्या वर्षी एका बंगाल इलाख्यांत ७०० बायका सती गेल्या, असें ह्मणतात. ही वहिवाट लार्ड विलियम बेंटिंक ह्यानें बंद करून टाकिली. मी आपल्या घराचा मालक असलों, तरी तें जाळून टाकण्यास मला अधिकार नाहीं; कां कीं, त्यावर सगळ्या कुटुंबाची सत्ता आहे; माझी एकट्याची नाहीं. त्याप्रमाणें, कोणतेंही मनुष्य आपल्या व्यवहारांविषयीं जरी स्वतंत्र असलें, तरी आपणास मारून घेण्यास त्यास अधिकार नाहीं; कां कीं, तें जितक्यांचें आप्त किंवा संबंधी असतें, तितक्या सर्वांची सत्ता त्यावर असते. ह्मणून ही क्रूरपणाची चाल बंद झाली, हें फार उत्तम झालें.

**ठग लोकांचा** उपद्रव ह्या देशांत पूर्वी फार असे. ह्मणजे ते लोक, गरीब प्रवाशांस रस्त्यांत एकटें गांठून, त्यांचे

गळे दाबून, त्यांस ठार मारून त्यांचे जवळचा ऐवज घेत असत. त्यांचा बंदोबस्त करण्यास लार्ड विलियम बेंटिंक ह्यानें मेझर स्लीमन ह्यास नेमून त्यांचा अगदीं विध्वंस करून टाकिला. अशा प्रकारचे लोक नाहींतसे करणें हें देशाच्या सुखाचें एक उत्तम साधन होय.

आमच्या राष्ट्राचें हित करणारे असे जे कोणी परकीय पुरुष आजपर्यंत होऊन गेले, ते नांवानें मात्र परके; वास्तविक पाहिलें असतां, हे आमच्यांतलेच होत. त्यांचें विस्मरण आह्मांस कधींही न होवो.

---

## स्थलमाहात्म्य.

### श्लोक.

कुरुक्षेत्रा[1] झाले समर[2] तुजमध्यें वद किती
अरे त्वां शूरांचे वध बघितले त्यां न गणती
किती साधोनीयां जय अतुल मागें परतले
अशा तूतें वर्णूं कवण कवि मागें क्षण वळे. १.
अहा काशी तूझा अतुल महिमा साधु ह्मणती
करिती यात्रा त्यां खचित घडते उत्तम गती
यशा गाया तूझ्या गुरुहि[3] न समर्थ क्षणभरी
करावी अन्यांहीं बडबड कशाला वद तरी. २.
अगे प्लासी[4] नाहीं तव चरित संतोषद तरी
मनीं राहे ऐशी तुजसम नसे भूमि दुसरी
तुझ्या येथें झालें कपटसमर[5] ज्ञात[6] सकलां

---

१ पाणिपत. २ युद्ध, ३ बृहस्पति. ४ प्लासी बंगाल्यांत आहे; तेथें इ० स० १७५७ त इंग्लिशांस जय मिळाला, हाच त्यांच्या येथच्या राज्याचा पाया. ५ लबाडीचें युद्ध. ६ ठाऊक.

तयानें इंग्रेजां अनुपम जगीं लाभ घडला. ३.
तसें आहेसी तूं परम वडगांवा लघु जरी
तुझें होतें आह्मां स्मरण बहु तोषप्रद तरी
मराठ्यांनीं केलें प्रकट निजधैर्यास यवनीं
कसे ते गेले हो दिन तळमळे जीव भुवनीं. ४.
तुला खर्डें ऐसें जन ह्मणति माना तुकंविती
मराठ्यांहीं म्लेच्छ प्रचुर[11] चुरिले त्यांस न मिती[12]
महामानी[13] पाणी[14] शरण खल जोडोनि रडला
कथा ती वाचोनी सुरसिक जनां लाभ घडला. ५.
अशीं वर्णनीयें स्थलें रम्य भारी
तयांच्या कथा वाचितातील विचारी
तयांनीं तयां फार संतोष होतो
न लाभे पहा अन्य लोकांस हो तो. ६.

---

## उपयोगी नाहीं असें कांहीं नाहीं.

फार सूक्ष्म रीतीनें विचार करून जगांतल्या व्यवहारांकडे पाहिलें ह्मणजे असें लक्षांत येतें कीं, ह्या पृथ्वीवर जें कांहीं आहे, तें सर्व उपयोगी आहे; किंवा ज्या वस्तु खरोखर सर्वांच्या उपयोगीं पडत नाहींत, त्या निदान कांहीं लोकांच्या तरी उपयोगीं पडतात, एवढेंच केवळ नव्हे; तर त्या कितीएकांच्या कल्याणास कारणीभूत होतात.

---

७ वडगांव, पुणें जिल्ह्यांत आहे; तेथें मराठ्यांनीं इ० स० १७७९ त इंग्लिशांचा केवळ पराभव केला. ८ घरांत. ९ खर्डें नगर जिल्ह्यांत आहे; तेथें इ० स० १७९५ त मराठ्यांनीं निजामाचा पराभव केला. १० डोलविती. ११ खूब. १२ मोजमाप. १३ मोठा अभिमानी अमीर उल्मुलुक. १४ हात.

अन्न खायास उपयोगीं पडतें; पाणी प्यावयास उपयोगीं पडतें; वस्त्रें पांघरायास उपयोगीं पडतात; घर राहायास उपयोगीं पडतें; पैसा देवघेवीच्या व्यवहारास उपयोगीं पडतो; आणि औषध रोगनिवारणास उपयोगीं पडतें; ह्याविषयीं तर कांहीं शंका नाहींच. परंतु, ज्या वस्तु खरोखर वाईट आहेत, त्या देखील कितीएकांच्या उपयोगीं पडतात, हा चमत्कार आहे.

पहा. चोरी करणें; मारामारी करणें; खोटे कागद करणें; इत्यादि गोष्टी वस्तुतः अगदीं वाईट आहेत. त्या इतक्या कीं, त्या सगळ्या ह्या जगांतून जर नाहींतशा झाल्या, तर मनुष्यांस फार सुख होईल, ह्यांत कांहीं संशय नाहीं. परंतु, प्रत्येक देशामध्यें राज्यकर्त्यांच्या मोठमोठ्या सैन्यांचा, न्यायाधीशांचा आणि कामदारांचा जो एवढा मोठा डौल चालला आहे, त्यास मूळ आधार ह्या दुर्गुणांचा आहे. चोर, खून करणारे, आणि दुसरे अपराध करणारे दुष्ट लोक, हे जर ह्या जगामध्यें नसते, तर, सैन्यें, शिपाई, न्यायसभा, आणि मोठमोठे वकील ह्यांच्या व्यवहारांस मुळींच थारा मिळाला नसता. ठीकच आहे. रोगच जर नसते, तर वैद्य कशाला पाहिजे होते ? ह्मणजे, हे दुर्गुण जे आहेत, ते, ज्यांच्या अंगीं असतात, त्यांस दुःखदायक होतात; परंतु इतर मनुष्यांतल्या कितीएकांचे सुखास कारण होऊन, त्यांचें वैभव वाढवितात. हें नवल नव्हे काय ?

ह्या विषयाचा विचार करितांना आणखी एक फार विलक्षण चमत्कार मनांत येतो. तो असा. सज्जनांच्या आंगीं जे सद्गुण असतात, ते त्यांच्या उपयोगीं पड·

तात, हें तर उघड आहेच. परंतु, दुष्टांच्या ठायीं जे दुर्गुण असतात, ते देखील त्यांच्या उपयोगीं पडतात. ह्मणजे, असें झालें कीं, सज्जनास जसें चांगल्यापासून साह्य होतें, तसें वाइटापासूनही होतें ! तेव्हां सज्जनपणाचा महिमा किती ह्मणून वर्णावा !

जगाची रचना कशी असावी, हें ज्यास सर्वांत उत्तम प्रकारें कळत आहे, त्यानें ती त्याप्रमाणें करून ठेविली आहे. तींत न्यून कांहींएक नाहीं. सर्व प्रकारच्या गोष्टींनीं मनुष्याचें कल्याण होत आहे. ह्यास्तव, जें आहे, तें यथास्थित आहे, असें जें साधु ह्मणतात, त्यावर विश्वास ठेवून, त्यांच्या उपदेशाप्रमाणें वागावें, हेंच उत्तम आहे. आणि त्यांचा उपदेश ह्मणजे हा एवढाच—

### श्लोकार्ध.

जगीं निंद्य तें सर्व सोडोनि द्यावें
जगीं वंद्य तें सर्व भावें करावें.

रामदास.

---

## सोन्याचा पेला.

पेला सोन्याचा असो किंवा पितळेचा असो; त्याची योग्यता त्या धातूच्या किमतीवर नाहीं; तर त्यांतल्या पदार्थाच्या उपयोगावर आहे. ज्यांतल्या पदार्थाचा उपयोग उत्तम बोधप्रद झाला आहे, तो पेला कशाचा जरी असला, तरी, तो सोन्याचा ह्मणावा.

भीमराजाची उदार कन्या कृष्णाकुमारी, ही, आपल्या पित्याच्या राज्याच्या रक्षणाकरितां ज्या पेल्यांतून

विष प्याली, तो पेला वस्तुतः कशाचाही असो; तरी, तो सोन्याचा होता ह्मणावा.

मासिडोन देशाचा शिकंदर बादशहा, आपल्या सैन्यासहवर्तमान मोठ्या अरण्यांतून, भर उन्हांतून चालला होता. तेव्हां सर्वांचे घसे तान्हेनें अगदीं सोखून जाऊन प्राण कासावीस झाले होते. इतक्यांत कोणी एका मनुष्यानें, पुष्कळ प्रयत्न करून, बादशहास, एक पेलाभर पाणी आणून दिलें. तें हातांत घेऊन तो आपल्या तोंडाला लावणार होता. इतक्यांत त्याच्या मनांत कांहीं विचार आल्यासारखें दिसून, तें पाणी त्यानें जमिनीवर ओतून टाकिलें. तें पाहून सर्वांस फार विस्मय वाटला. त्याचें निरसन करण्याकरितां, तो चतुर आणि थोर बादशहा त्यांस ह्मणाला, “अहो, इकडे पहा. हें पाणी मला पितांना जर माझ्या सरदारांनीं पाहिलें, तर त्यांची तृषा दुणावेल, आणि त्यांस अधिक ताप होईल. आणि ज्यांनीं आपले जीव मजकरितां एवढ्या संकटांत घालून घेतले आहेत, त्यांस तळमळत टाकून, मीं एकट्यानें पाणी पिऊन तृप्त व्हावें, हें योग्य नाहीं. ह्मणून मीं हें असें केलें.” तर मग तो ही पेला सोन्याचा होता ह्मणावा.

आस्ट्रिया देशाचा वैभवाचा मुख्य स्थापक रोडालफ, ह्याची अशीच एक गोष्ट पुस्तकांतून लिहिली आहे. त्या प्रसंगीं तो जवळच्या लोकांस ह्मणाला, “हें पाणी माझ्यानें एकट्याच्यानें पिववत नाहीं; आणि हें सर्वांना तर पुरायाचें नाहीं. केवळ माझी तान्ह भागल्यानें मला सुख व्हावयाचें नाहीं; तर, मला सुख होण्यास माझ्या

सगळ्या सैन्याची तान्ह भागली पाहिजे. कारण, मला एकट्याला लागली आहे, तेवढीच कायती माझी तान्ह नव्हे, तर, माझ्या सगळ्या सैन्यास लागली आहे, ती माझी तान्ह." असें ह्मणून त्यानें त्या पेल्यांतलें पाणी भुईवर ओतून टाकिलें. तो पेला सोन्याचा होय.

सोनें ह्मणजे काय? सोनें ह्मणजे उत्तम. अमक्यातमक्याचें सोनें झालें, ह्मणजे काय? उत्तम झालें. ह्मणूनच, ज्या पेल्यांतल्या पदार्थाचा परिणाम सोन्यासारखा झाला, तो पेला सोन्याचा ह्मटला पाहिजे.

## जिभेला पाय.

एका मुलानें आपल्या आईला विचारिलें, "कायग आई, तुझ्या जिभेला पाय आहेत का?

**आई.**— काय? माझ्या जिभेला पाय? असें भलतेंच काय विचारतोस?

**मुलगा.**— आई भलतेंच कसेंग? तुझी जीभ सकाळपासून संध्याकाळपर्यंत एकसारखी चाललेली असते, असें बाबा ह्मणतात; ती जीभ पायांवांचून चालेल कशी?

## खुबीदार उत्तर.

एक पोरका मुलगा आपल्या चुलत्याच्या येथें राहत असे; आणि तो चुलता त्याचे फार हाल करीत असे. एके दिवशीं ते चुलतेपुतण्ये रस्त्यानें जात असतां, त्यांस एक मरतुकडा कुत्रा आढळला. तेव्हां त्या मुलास त्याच्या चुलत्यानें विचारिलें, "कायरे, हा इतका रोड कशानें झाला असेल बरें?" त्या मुलानें जरा थांबून उत्तर केलें, "तो आपल्या चुलत्याकडे रहात असेल!"

# बालबोध.

## निजाम सरकार.



हिंदुस्थानामध्यें जीं एतद्देशीय राज्यें राहिलीं आहेत, त्या सर्वांत निजाम सरकारचें राज्य फार मोठें आहे. ह्याच्या गादीवर जे नबाब हल्लीं आहेत, त्यांचे मूळ पुरुष चिनकिलिचखान उर्फ निजामउल्मुलुख हे होते. ते औरंगजेबाच्या तालमेंत तयार झालेले सरदार होते; आणि त्यांनीं मोठमोठे पराक्रम करून आपलें नांव मागें ठेविलें आहे. ते इ० स० १७४८ च्या जून महिन्यांत निवर्तले. त्यानंतर एकामागून एक नबाब गादीवर येऊन, शेवटीं ह्या सध्याच्या नबाब सरकारचे वडील अफजूल-

उद्दवला हे इ० स० १८६९ ह्या वर्षी मरण पावले. नंतर सध्याचे नबाब साहेब मीरमाबुबअल्लीखान हे त्यांच्या गादीवर बसले. तेव्हां हे केवळ चार वर्षांचे होते. ह्मणून ह्यांच्या राज्याचा कारभार चालविण्याकरितां प्रधानमंडळ नेमिलें. त्याचे मुख्य सर सालरजंग हे होते. त्यांची हकीकत आह्मीं मागें एका अंकांत दिलीच आहे.

हे नबाबसाहेब गादीवर बसल्यापासून ह्यांच्या राज्याचा कारभार फार चांगल्या प्रकारें चालला आहे. त्यांत इतिहासामध्यें लिहिण्यासारखी अशी एकही विशेष गोष्ट घडली नाहीं. आतां हे नबाब वयांत आले आहेत; आणि ह्यांस राज्याचें कामकाज समजूं लागलें आहे. हे गेल्या डिसेंबर महिन्यांत कलकत्ता येथें प्रदर्शन पाहण्यास गेले होते. तेथें ह्यांची आणि लार्ड रिपन ह्यांची मुलाकत झाली. तेव्हां उभयतांस फार संतोष झाला. आतां ह्या महिन्यामध्यें लवकरच नबाब साहेबांस आपलें राज्य स्वतः चालविण्याची मुखत्यारी मिळावयाची आहे; आणि त्या संबंधानें मोठा समारंभ होणार आहे.

हे नबाबसाहेब मोठे बुद्धिवान् आणि तेजस्वी आहेत, असें ऐकतों. परंतु ह्यांच्या संबंधानें आणखी लिहिण्यास सध्या कांहीं नाहीं. तरी आतां राजपदारूढ झाल्यावर, व सर्व अधिकार हातीं घेतल्यावर, हे इतिहासांत लिहिण्यासारख्या पराक्रमाच्या गोष्टी आपल्या पूर्वजांप्रमाणें करोत, ह्यांचे हातून प्रजापालन उत्कृष्ट प्रकारें होवो, आणि ह्यांची कारकीर्द शंभर वर्षपर्यंत आनंदाची होवो, असें परमेश्वरापाशीं अनन्य भावेंकरून प्रार्थनापूर्वक मागून, हा अल्प लेख आह्मी समाप्त करितों.

---

## प्रजाजनविलाप.

गेल्या दिसेंबर महिन्याच्या पंचविसाव्या तारखेस अहमदनगर येथें कोल्हापुरचे राजे शिवाजीमहाराज एकाएकीं मरण पावले. तेणेंकरून सगळ्या महाराष्ट्रास पराकाष्ठेचें दुःख झालें आहे. त्याच्या संबंधाचे हे उद्गार आहेत.

### श्लोक.

हा हा राजा मरण तुजला फार वाईट आलें
सर्वा राष्ट्रा प्रखर अनलासारखें तें जहालें
येवोनीयां शुभ शिवकुलीं ही दशा काय व्हावी
प्रारब्धाची गति सकलिकां लागते कीं वहावी. १.
भोगावें त्वां नरपतिसुखा स्वस्थचित्तें ह्मणोनी
आईबापीं तुज परकरीं दीधलें आदरोनी
त्यांहीं तूला अमृत ह्मणुनि पाजिलें जें प्रभो तें
झालें कैसें विष हर हर स्पष्ट लोकांत हो तें. २.
ज्यांनीं पादां तव निजशिरीं नम्रतेनें धरावें
श्वानांवाणी तुज पुढपुढें तोषवाया करावें
त्यांनीं तूतें फड फड फडां मारिलें चाबकांहीं
झालासी तूं भ्रमित बहुधा त्या महा यातनांहीं. ३.
पाहोनी हे स्थिति बुधजनां वाटलें दुःख भारी
त्यांच्या नेत्रांतुनि खळखळां वाहलें फार वारी
तूझ्या मुक्तीस्तव तनमनें यत्न केले तयांहीं
दुर्दैवानें परि यश तयां जाहलें प्राप्त नाहीं. ४.
त्वद्दुःखाचें निरसन करूं ये न जेव्हां जनाला
तेव्हां मृत्यू सदय हृदयें तें करायास आला
आली त्याला प्रभु तव दया मानवां ती न आली
छी छी छी ते शरमुनि तुला मान घालोत खालीं. ५.

आतां प्रभो शिवपुरीं चिरकाल राहीं
तेथें सुखास लवमात्र कमी न कांहीं
ठेवीं कृपा तरि जनांवर या विशाला
हा शेवटील वर दे करवीरपाला. ६.

---

## जूं.

घोडे, बैल, रेडे इत्यादि पशूंस गाड्या, नांगर, घाणे इत्यादिकांस जुंपितात, तेव्हां त्यांच्या मानांवर जें लांकूड ठेवितात, त्यास जूं असें ह्मणतात. त्या जुंवाच्या योगानें त्यांस अगदीं जखडल्यासारखें होऊन, इकडे तिकडे वळतां येत नाहीं, कीं इकडे तिकडे पाहतां येत नाहीं. शिवाय, लवकर लवकर चालण्याकरितां त्यांच्या पाठींवर चाबकांचे आणि काठ्यांचे तडाखे बसत असतात, ते वेगळेच. अशा स्थितीमध्यें त्या प्राण्यांकडे पाहिलें ह्मणजे त्यांची फार दया येते, आणि कधीं कधीं वाईटही वाटतें.

आतां, थोडा विचार करून पाहिला ह्मणजे असें लक्षांत येतें कीं, हें जसें एक जूं त्या पशूंच्या मानांवर असतें, तसें एकच जूं नव्हे, तर तशीं तीन जुंवें मनुष्यांच्या मानांवर असतात; त्यांच्या योगानें तीं अगदीं जखडल्यासारखीं होतात; त्यांस स्वेच्छेप्रमाणें भलत्याच रीतीनें वागतां येत नाहीं; आणि त्यांस त्या पशूंप्रमाणें मधून मधून तडाखेही सोसावे लागतात. हें वाचून प्रथम फार आश्चर्य वाटेल, आणि कदाचित् हंसायासही येईल. परंतु, तें अगदीं खरें आहे. तें असें.

साधारणपणें मनुष्यें दोन प्रकारचीं दिसतात; लहान आणि मोठीं. लहान ह्मणजे अल्पवयस्क मुलें; आणि मोठीं ह्मणजे प्रौढ मनुष्यें. ह्या दोन्ही प्रकारच्या माणसांच्या मानांवर जुंवें असतात. आईबापांच्या आज्ञेंत वागणें, शिक्षकांच्या आज्ञेंत वागणें, आणि प्रसंगीं आपली इच्छा एकीकडे ठेवून मित्रांच्या इच्छेप्रमाणें वागणें, हीं तीन जुंवें लहानांस वहावीं लागतात. आणि ह्यांत अंतर पडलें कीं शब्दांचे आणि कधीं कधीं काठ्यांचेही तडाखे सोसावे लागतात. ह्याचा अनुभव सर्व मुलांनीं आपापले ठायीं पहावा.

त्याप्रमाणेंच, निर्वाह चालण्याकरितां उद्योग करणें, लौकिकास जपणें, आणि सर्व कामांमध्यें परमेश्वरास भिणें, हीं तीन जुंवें प्रौढ माणसांस निरंतर वाहावीं लागतात. आणि त्यांत जरा कसूर झाल्याबरोबर निर्वाहाची पंचाईत पडणें, अपमान सहन करणें, आणि आपल्या पापांबद्दल परमेश्वर आपणांस काय शासन करील कोण जाणे असें वारंवार भय वाटणें, हे तडाखे त्यांस सोसावे लागतात. ह्याचा अनुभव प्रौढमाणसांनीं आपले ठायीं पहावा.

जीं जनावरें आपल्या मानांवरचें जूं बरोबर रीतीनें वाहतात, आणि तडाख्यांचें कारण पडूं देत नाहींत, तीं सर्व माणसांस आवडतात, आणि त्यांपासून सुख पावतात. त्याप्रमाणेंच, जीं लहानमोठीं माणसें आपल्या मानांवरचीं जुंवें योग्य प्रकारें वाहतात, आणि तडाखे सोसण्याचा प्रसंग येऊं देत नाहींत, तीं सर्व जनांस प्रिय होऊन सुख पावतात, एवढेंच केवळ नव्हे; तर परमेश्वरासही प्रिय

होऊन शेवटीं उत्तम गतीस जातात. ह्याविषयीं थोर माणसांच्या पुष्कळ साक्षी पटल्या आहेत.

हीं जुवें आपल्या तुकारामबुवांनीं फार चांगल्या प्रकारें वाहिलीं, असें त्यांच्या चरित्रावरून दिसतें. शेवटीं "रामकृष्णविठ्ठल बोला, तुका जातो वैकुंठाला," अशी जी अमृतासारखी वाणी निघाली, ती उगाच निघाली काय ?

तत्ववेत्ता साक्रेटिस, विषप्राशन करण्याच्या आधीं, आत्म्याच्या आमरत्वाविषयीं आपल्या शिष्यमंडळीस शांतपणें उत्कृष्ट बोध करून ह्मणाला, "माझीं कामें परमेश्वरास पसंत पडतील किंवा न पडतील, हें मला ठाऊक नाहीं. परंतु, जें काय मीं केलें, तें त्यास संतुष्ट करण्याकरितां केलें, हें अगदीं खचीत आहे; आणि ह्मणून माझीं कामें त्याला पसंत पडतील, अशी मला आशा आहे." हे शब्द, जुंवें बरोबर रीतीनें वाहतां आल्यावांचून अंतकाळीं तोंडांतून निघावयाचे नाहींत.

हीं जगांतलीं जुंवें, होईल तितक्या चांगल्या रीतीनें वाहण्याचा प्रयत्न करणें, हेंच खरें जन्मसार्थक्य होय.

---

## विचारभ्रम.

सर ऐझाक न्यूटन हा एक नामांकित तत्ववेत्ता इंग्लंडांत होऊन गेला. तो एके दिवशीं एका गृहस्थाच्या घरीं जाऊन उतरला. तेथें तो आपल्या खोलींत विचार करण्यांत इतका अगदीं गढून गेला कीं, सकाळची फराळाची वेळ टळून गेली, आणि मंडळी फराळ करून उठली, तरी तो बाहेर आला नाहीं. तेव्हां यजमानास

असें वाटलें कीं, ह्मापुढें जर त्यास उपाशीं राहूं दिलें, तर कदाचित् त्याची प्रकृति बिघडेल. ह्मणून त्यानें आपल्या एका चाकरास सांगितलें कीं, शेगडींत निखारे घालून, ती, आणि एक आंडें घेऊन त्याच्या खोलींत जा, आणि पाण्यांत तें आंडें उकडून त्यास खायास दे. त्याप्रमाणें तो त्या खोलींत गेला, तेव्हां न्यूटन हा मेजाशीं उभा राहून विचार करीतच होता. त्यानें त्या नौकराकडे पाहून, त्याला तें सगळें तसेंच तेथें ठेवून जाण्यास खुणविलें. तेव्हां, मेजावर त्याचें घड्याळ होतें, त्याच्या शेजारीं तें आंडें ठेवून, आणि शेगडी त्याच्या जवळ राहूं देऊन, तो बाहेर निघून गेला. पुढें कांहीं वेळानें त्या चाकराला असें वाटलें कीं, न्यूटनानें फराळ केला कीं नाहीं तें जाऊन पहावें. ह्मणून तो आंत जाऊन जों पाहूं लागला, तों, तो तत्वज्ञानी पहिल्याप्रमाणें मेजाशीं विचारमग्न होत्साता उभा आहे, तें आंडें त्याच्या हातांत आहे, आणि त्याचें घड्याळ त्या शेगडीवरच्या पाण्यांत उकळत घातलें आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें ! ह्याला काय ह्मणावें ? ह्याला विचारभ्रम ह्मणावें.

---

## सुतार आणि खलाशी.

**सुतार.**— अहो खलाशीबावा, तुमचा बाप कशानें मेला बरें ?

**खलाशी.**— समुद्रांत बुडून.

**सुतार.**— आजा कशानें मेला ?

**खलाशी.**— समुद्रांत बुडून.

**सुतार.**— आणि पणजा ?

**खलाशी.**— तसाच.

**सुतार.**— इतकें झालें, तरी तुह्मांला समुद्रावर जाण्यास भय कसें वाटत नाहीं हो ?

**खलाशी.**—तुमचा बाप, सुतारबावा, कशानें मेला हो?

**सुतार.**— दुखणाईत होऊन, आंथरुणावर पडून.

**खलाशी.**— आणि आजा ?

**सुतार.**— तसाच.

**खलाशी.**— आणि पणजा हो ?

**सुतार.**— तो देखील तसाच आंथरुणाला खिळून.

**खलाशी.**— इतकें झालें, तरी तुह्मांला आंथरुणावर पडायाला भय कसें वाटत नाहीं हो ?

ह्याप्रमाणें जशास तसें उत्तर मिळाल्यावर ते दोघे निरुत्तर होऊन, आपआपल्या वाटांनीं निघून गेले.

---

## निस्पृहता.

ख्रिस्ती शकाच्या पहिल्या शतकांत रोम येथें त्राजन ह्मणून एक बादशहा होऊन गेला. तो मोठा पराक्रमी आणि निस्पृह होता. त्यानें एके प्रसंगीं साबारनस ह्या सरदारास एक तरवार बक्षीस दिली, आणि चारचौघां समक्ष असें सांगितलें कीं, "माझ्या हिताच्या कामीं ह्या तरवारीचा उपयोग करा; पण, मी जर अकर्म करण्यास प्रवृत्त झालों, तर ही बेलाशक मजवर उपसा; मनांत काडीमात्रही शंका आणूं नका." असें सांगणारे यजमान थोडे; आणि ह्याप्रमाणें वागणारे नौकर त्यांहूनही थोडे.

# बालबोध.

## एडमंड बर्क.



मुलें चांगलीं निपजलीं आणि मोठ्या लौकिकास चढलीं ह्मणजे आईबापांस त्यांचें मोठें कौतुक होतें, आणि भूषण वाटतें. त्याप्रमाणेंच, राष्ट्रामध्यें जे पुरुष उत्तम गुणांवरून सर्व जनांस पूज्य वाटतात, त्यांवरून त्या राष्ट्रांतल्या लोकांस त्यांचें मोठें भूषण वाटतें, आणि ते त्याविषयीं गर्व वाहतात. तो गर्व यथायोग्य होय. अशा प्रकारच्या ज्या पुरुषांविषयीं इंग्लिश लोकांस मोठें भूषण वाटतें, त्यांत एडमंड बर्क ह्या पुरुषाची गणना आहे.

एडमंड बर्क हा इ. स. १७३० ह्या वर्षी डब्लीन येथें जन्मला. त्याचा बाप तेथें मोठा नामांकित आणि

संभावित वकील होता. बर्क ह्याचा विद्याभ्यास डब्लीन येथील ट्रिनिटिनामक पाठशाळेंत झाला. त्याची बुद्धि लहानपणापासून अत्यंत तीव्र होती. आणि जें कांहीं करावयाचें तें अगदीं मनापासून करावयाचें, असा त्याचा स्वभाव पहिल्यापासून असल्यामुळें, सगळ्या विषयांत तो चांगला मार्मिक आणि प्रवीण झाला होता. त्यांचें मन अगदीं मोकळें होतें; आणि त्याला अन्यायकर्माचा तिटकारा पराकाष्ठेचा असे. हा पार्लमेंटाचा सभासद असून नामांकित वक्ता होता. ह्याचे वेळीं राज्यव्यवहारसंबंधाच्या फार मोठ्या तीन गोष्टी झाल्या. त्या ह्या:— अमेरिकेंतल्या लोकांशीं युद्ध; वारन हेस्टिंग्ज, गव्हरनर जनरल, ह्याची चौकशी; आणि फ्रान्स देशांतील महाराज्यक्रांति.

ह्यांतल्या पहिल्या गोष्टीविषयीं बर्क ह्याचें मत असें होतें कीं, आह्मी इंग्लंडांतले लोक राज्यकर्ते आहों, एवढ्यावरून अमेरिकेंतल्या लोकांवर पाहिजेत तसे कर बसविण्यास आह्मांस अधिकार आहे, असें जें इंग्लिश लोकांचें आग्रहाचें ह्मणणें आहे, तें योग्य नाहीं. शेवटीं, उभय पक्षांचा कलह होऊन, बर्क ह्याचें ह्मणणें खरें झालें, आणि इंग्लंडाच्या ताब्यांतून अमेरिकेंतलीं संस्थानें गेलीं.

दुसरी गोष्ट ह्मणजे वारन हेस्टिंग्ज ह्याची चौकशी. वारन हेस्टिंग्ज ह्यानें हिंदुस्थानांत राज्यकारभार चालवितांना जीं अत्यंत भयंकर कर्में केलीं, तीं बर्क ह्यास कळल्यावर त्यांविषयीं त्यास पराकाष्ठेचा संताप आला, आणि केवळ न्यायबुद्धीनें, त्यानें पार्लमेटसभेंपुढें त्याच्या कृष्णकर्मांचें पातडें वाचलें. तें इतर श्रोत्यांच्या मनांवर

ठसलें, ह्यांत कांहीं नवल नव्हे; स्वतः वारन हेस्टिंग्ज एके वेळीं अगदीं सद्गदित होऊन, डोळ्यांत पाणी आणून ह्मणाला, कीं, " एवढालीं विलक्षण राक्षसी कर्में माझ्या हातून घडलीं आं ! काय करावें ?" तरी त्याच्या कृत्यां-पासून सरकारास पुष्कळ लाभ झाले होते, ह्मणून शेवटीं त्याला त्यांनीं दोषमुक्त केलें.

आणि तिसरी गोष्ट फ्रान्स देशांतली राज्यक्रांति. लोकांच्या डोक्यांत नास्तिकपणाचें विलक्षण वेड शिरून, आणि राज्यांतला जुलूम त्यांस अगदीं सोसेनासा होऊन, त्यांनीं आपला राजा सोळावा लुई आणि त्याची राणी मेरी आंत्वानेत ह्यांस ठार मारिलें. हें राक्षसी कर्म ऐ-कून एडमंड बर्क ह्याच्या आंगावर रोमांच उभे राहिले, आणि फ्रेंच लोक जीं अघोर कर्में आणखी करीत होते, त्यांच्या प्रतीकाराविषयीं उद्योग करण्यास बर्क ह्यानें, इंग्लंडांतल्या सरकारास आणि लोकांस जागृत केलें.

ह्या तिन्ही प्रकरणांवरचीं त्याचीं भाषणें आणि त्या-चे लेख हीं अनेक उत्तम विचारांनीं भरलीं आहेत. त्यांचीं मोठमोठीं पुस्तकें झालीं आहेत. आणि तीं पुस्तकें वि-द्वान् पुरुषांस मान्य आणि प्रिय आहेत. तीं इंग्लिश भाषेचीं अमोलिक भूषणें होत. बर्क ह्याचीं वचनें खोल असत. "आपले वैरी ते आपले साह्यकर्ते होत," असें त्यांत एक वचन आहे. हें वचन "निंदकाचें घर असावें शेजारीं," ह्या अभंगासारखें कांहींसें आहे.

हा थोर पुरुष, मोठा कीर्तिमान् होऊन, इ० स० १७९१ह्या वर्षीं मरण पावला. असे निर्मलांतःकरण पुरुष राष्ट्रामध्यें उत्पन्न होणें, हें राष्ट्राचें मोठें भाग्य होय.

## औरंगजेबास संभाजीमहाराजाचें उत्तर.

### श्लोक.

कां पाहसी यवन तूं मजला कराया
हे व्यर्थ जातिल तुझे श्रम लोकराया
त्यागोनियां स्वजनधर्म दुजा वरीती
त्यांची कुणासहि रुचे न नवीन रीती. १.
धर्मेंकरून परमेश्वर ओळखावा
हा एवढाच उपयोग खरा असावा
तो साधतो धरुनियां निजधर्म माथां
ध्यावा कशास्तव दुजा मग लोकनाथा. २.
हे धर्म सर्व परलोकपथप्रविष्ट
ज्याचा तयासहि तयांत खरा अभिष्ट
आह्मी असें धरितसों मत सर्व हिंदू
भूपा नको भ्रमित होउनि यास निंदूं. ३.
जिव्हा तुझी झडझडोनि गळेल अंतीं
उत्पन्न होइल तुझी तुजलाच खंती
तूं पावशील अति दुःख बहु प्रकारीं
पापें तुझीं तुज पहा फळतील सारीं. ४.
घेणार मी यवनधर्म कदापि नाहीं
साहीन तें सकल जें करिशील कांहीं
घेशील जीव तरि घे सजलों मराया
चांडाळ तूं कुठुनि तूज विचार माया ५.
अल्ला तुझा तुज तसा मज राम माजा
मूर्खा न तत्व समजे तुज हें पहा जा
तूं मारितोसि मज हाल करोनि जैसे
मारील कीं यम तुलाहि करोनि तैसे. ६.

## आर्या.

इतिहासावरुनि पहा, हें झालें सर्व कीं खरें पुढती
पापाचरण करिति ते, निःसंशय दुःखसागरीं बुडती.७.

---

## स्वदेशहित.

स्वतःचें हित साधणें हें साधारण कुत्र्यामांजरांत देखील असतें; तें माणसांच्या ठायीं असलें तर कांहीं विशेष नाहीं; ह्मणजे केवळ स्वहित साधणारीं मनुष्यें जीं आहेत, तीं ह्या अन्य प्राण्यांच्या योग्यतेचीं होत. आपल्या आप्तांचें आणि इष्टमित्रांचें हित साधितात, तीं त्यांच्या वरच्या प्रतीचीं होत; आपल्या जातीचें हित साधितात, तीं त्यांच्या पेक्षां वरच्या प्रतीचीं होत; आणि, आपल्या देशाचें हित जीं माणसें साधितात, तीं त्यांहूनही श्रेष्ठ होत. त्यांची बरोबरी दुसऱ्या कोणत्याही प्रकारच्या माणसांच्यानें करवणार नाहीं. ह्मणूनच, स्वदेशहित साधणें हें उत्तम जन्मसार्थक्य ह्मटलें आहे. हें हित दोन प्रकारचें आहे, ऐहिक आणि पारलौकिक. आपल्या देशबांधवांचें सुख वाढविणें किंवा दुःख कमी करणें, हें त्यांचें ऐहिक हित करणें होय. आणि मरणानंतर त्यांस उत्तम गति प्राप्त होईल असा ईश्वरभक्तीचा मार्ग त्यांस दाखविणें, हें त्यांचें पारलौकिक हित करणें होय. ह्यांतलें कोणत्याही प्रकारचें स्वदेशहित करणें ह्मटलें ह्मणजे, मनुष्यानें स्वसुखाची आणि स्वहिताची इच्छा अगदीं एकीकडे ठेविली पाहिजे.

इकडे युरोपियन लोकांचा मुळींच प्रवेश नव्हता, तेव्हां, इ० स० १४९८ ह्या वर्षीं, वास्को डी गामा हा पोर्तुगीज सरदार, हिंदुस्थानाच्या अंतर्भागीं येण्यास निघाला असतां, त्याच्या बरोबरच्या लोकांनीं त्यास असें सांगितलें कीं, आंत लोकस्थिति कशी काय आहे ती कळल्यावांचून आपण आधीं आंत जाऊं नये; कां कीं, लोक जर अगदीं रानटी असले, तर कदाचित् आपल्या जीवावरही बेतेल. त्यावर त्यानें त्यांस एकच उत्तर दिलें कीं, "आतां माझ्या जीवाचें कांहींही होवो; आमच्या लोकांस हिंदुस्थानांत व्यापार करण्याची मोकळीक मिळेल असे जे जे उपाय मला सुचतील, ते ते करून पाहिल्यावांचून मी कदापि रहावयाचा नाहीं." त्याप्रमाणें तो ह्या देशांत आला, आणि, महत्प्रयासानें त्यानें येथें आपला व्यापार स्थापित केला.

इंग्रज लोकांस हिंदुस्थानामध्यें जें एवढें मोठें राज्य मिळालें आहे, तें अशाच प्रकारच्या पुरुषांच्या उद्योगाचें फळ होय. इ० स० १६३८ ह्या वर्षीं शहाजहान बादशहाच्या मुलीस ग्याब्रिएल बौटन ह्या इंग्लिश वैद्यानें बरें केलें. त्या प्रसंगीं स्वतःकरितां द्रव्य मागून न घेतां, त्यानें आपल्या लोकांस राज्यामध्यें व्यापार करण्याची परवानगी बादशहापासून मिळविली. तेव्हांपासून त्यांचें वजन वाढत जाऊन, त्यांस अनेक लाभ झाले.

जार्ज वाशिंग्टन ह्यानें, आपल्या सुखाकडे काडीभरही लक्ष न देतां, आपल्या देशबांधवांस इंग्लंडाच्या ताब्यांतून काढून, इ० स० १७७६ ह्या वर्षीं स्वतंत्र

केलें, आणि त्यांच्यामध्यें प्रजासत्ताक राज्य स्थापिलें. तें आतां उत्तम प्रकारें चाललें आहे.

त्याप्रमाणेंच स्वजनांचें पारलौकिक हित साधणारे होऊन गेले. आपल्या तुकारामबुवांनीं संसाराकडे पाठ केली, आणि रामदासस्वामींनीं राज्य देखील नको ह्मटलें, तें कशाकारितां? आपला उद्धार करून घेण्याकरितां, आणि जनांस पारलौकिक सुखाचा मार्ग दाखविण्याकरितां. त्यांचा उद्योग केवळ आपल्या उद्धारासाठींच जर असता, तर, त्यांनीं मान मोडून ग्रंथ लिहिले नसते, आणि घसा कोरडा पडेपर्यंत भजनकीर्तन करून जनांस बोध केला नसता. सांप्रत काळीं ह्या जगामध्यें जे अनेक परमेश्वरभक्तिमार्ग चालले आहेत, ते सर्व अशाप्रकारच्या पुरुषांच्या श्रमांचीं फळें होत.

अशा प्रकारें विचार करून पाहिलें ह्मणजे, वास्को डी गामा, बौटन, वाशिंग्टन, पैगंबर महंमद, येशू ख्रिस्त, रामदासस्वामी, तुकाराम महाराज इत्यादि सर्व पुरुष, आपापल्या जन्मराष्ट्रांच्या हितास वेगळ्या वेगळ्या प्रकारीं कारणभूत झाले आहेत. ह्मणूनच जिकडे तिकडे त्यांचें देव्हारें चाललें आहे. इतर कोट्यवधि माणसें आजपर्यंत जन्मास येऊन मरून गेलीं, तसे हेही जन्मास येऊन मरून गेले आहेत. परंतु, त्यांत अंतर एवढेंच कीं, हे पुरुष मरून गेल्यास आज शेंकडों वर्षें झालीं, तरी, त्यांस जीवंत राजांपेक्षां अधिक मान मिळत आहे; आणि बाकीची मंडळी जगांत आली केव्हां आणि गेली केव्हां, ह्याचा मागमोसही नाहीं. ह्यावरून स्वदेशहित साधणें हें केवढें मोठें कृत्य आहे तें पहा.

---

## शत्रुनाशाचा उत्तम उपाय

कोणे एके वेळीं चीन देशामध्यें एक मोठें बंड झालें. आणि तेणेंकरून बादशहास फार त्रास होऊं लागला. तेव्हां त्यानें आपले सगळे सरदार दरबारामध्यें बोलावून बंडवाल्यांवर स्वारी करण्याचा निश्चय केला, आणि, मोठ्या आवेशानें असें ह्मटलें कीं, "बंडखोर हे आमचे शत्रु आहेत; त्यांचा समूळ नाश केल्यावांचून परत यावयाचें नाहीं." नंतर, बादशहाचा क्रोध पाहून ते बंडवाले भ्याले, आणि त्यास शरण आले. त्यांस बादशहानें त्यांच्या अपराधाची क्षमा केली, एवढेंच केवळ नव्हे; तर, ते शुद्धीवर आले ह्मणून त्यांस एक चांगली मेजवानी देण्याचा विचार ठरविला. तें पाहून त्याचा मुख्य प्रधान त्यास ह्मणाला, "महाराज, आपण दरबारामध्यें त्या दिवशीं बोललां काय, आणि आज हें करतां काय? शत्रूंचा समूळ नाश करावयाचा ना?" त्यावर थोडें हंसून बादशहानें उत्तर दिलें, "होय; शत्रूंचा समूळ नाश करावयाचा, असें मीं ह्मटलें होतें, तें मी शब्दशः खरें केलें आहे. पहा; आतां हे लोक माझे शत्रु नाहींत; हे माझे मित्र झाले आहेत; त्यांचा मी नाश केला तर, बोललों एक आणि केलें एक असें होऊन, मित्रघाताचें पातक माथां येणार नाहीं काय?" हें ऐकून तो मुख्य प्रधान निरुत्तर झाला.

---

## दुष्ट तो दुष्ट.

### आर्या.

खल न खलत्व त्यागी जरि सामें गौरवोनि बोळविला
लकुच कटुहि अमृतकरा-करवींही शर्करेंत घोळविला.— मोरोपंत.